श्रीजगदंबा प्रसन्न.

रायसिंहराय नारायण देवकृत

श्रीमंत

# नारायणराव पेशवे यांचा वध

अथवा

# आनंदीबाईचें

## अजब कारस्थान नाटक.






मुंबईंत,

जावजी दादाजी यांच्या

"निर्णयसागर" छापखान्यांत छापून

प्रसिद्ध केलें.

इ० स० १८९४.

( सर्व हक्क प्रसिद्धकर्त्यांनें स्वाधीन ठेविले आहेत. )

किंमत १ रुपया.

## ॥ प्रस्तावना ॥

**रसिक** हो ! ही पहा एक नवी **नटी** आणली आहे मीं, तुमच्या पुढें **रंगभूमी**वर ! इचे रंगढंग, इची चालचलन, इची बोलचाल, इची वहुतेक तऱ्हा तुह्माला तऱ्हेवाईक दिसेल ! तरी पण ती अपरिचित वाटणार नाहीं. कारण या **आर्यभूमी**वर ज्या ज-बर घडामोडी घडून आल्या आहेत, त्यांपैकींच एकीची अनुकृति करून दाखवीत आहें ही. ती किती–हुबेहूब वठते आहे हें पहाणें तुह्मां **सहृदय रसिकां**चेंच काम आहे. माझें काम जें इला बनावण्याचें होतें तें मीं यथाशक्ति केलें आहे. पण कितीही केलें तरी ही मानवी कृतिच; कोठें ना कोठें घसरायचीच ! पण तिच्या सुदैवानें तिला तुमच्यासारख्या **महामति रसिकां**चा **आसरा** मिळाल्यास, **घसराय**ची **भीति** तर नकोच ! उलट ती तुमच्याकडून सांवरली जाऊन, अंजारली गोंजारलीही जाणारच ! मग काय ! ती खूबच खुलणार !–पण तुमच्यासारखे **रसिक** मिळाले तर हें जुळणार ! कारण **विधी**च्या **विचित्र सृष्टींत** सर्वत्र **वैचित्र्या**चीच **रेलचेल** आढळते ! ह्मणूनच **एका**स जें **परम प्रिय** तेंच दुसऱ्यास **अत्यंत–अप्रिय** वाटतें ! तद्वतच **रसिकां**ची एक मात्र **प्रियतमा–प्राणेश्वरी** जी **सरसकृति** ती **अरसिकांच्या नीरस मतीला सरस** ह्मणून वाटायची नाहींच–हा सिद्धांत ! याचा अनुभव–त्या **महानुभाव कविराय सतसैयाकार बिहारीलाला**सही येऊन चुकला असावा, ह्मणूनच त्याच्या मुखांतून असे उद्गार बाहेर पडले:—

॥ दोहा ॥

**गिरिते ऊंचे रसिकमन बूडे जहां हजार !**
**वही सदा पशुनरनको प्रेमपयोधि पगार ! ॥ १ ॥**

अर्थात्–गिरीहूनही उंच अशीं जीं रसिकांचीं मनें, तीं हजारों

उत्तरही पण सहज हेंच कीं:–त्या **कविसिंहाच्या प्रभावक गद्यांत!**–अशा **गद्यांत** कीं **ज्याच्या पुढें सुपद्यही रद्द!!!** त्या गद्या विषयींही, पूर्वोक्त महाशयाचा असा **पोक्त सुलेख** आहे:—

\+ + + + Here the rhymed Alexandrine is discarded and the daring experiment is made of treating a lofty tragic theme in prose. But it is Lessing's prose, a prose such as no German ever wrote before and but too few since, a prose which is swift, rhythmic, brilliant and lucid, moving with an elastic, marching stride, instead of dragging forward an unmanageable bulk in a series of tortuous Convulsions." + + + +

अशीं **वीर्यवत्** नाटकें आमच्यांत अद्याप झालीं नाहींत याचें कारण काय? काय या **आर्यभूवर**– आह्मां **आर्यांत**ही, त्या **जर्मनमर्दा** प्रमाणें **जवान्मर्द वीरसिंह** जन्मास आले नाहींत? शेंकडों आले!–अहो शेंकडोंच काय हजारों होऊन गेले! असें इतिहासावरून सिद्ध होत आहे:–तो **एक मात्र इंग्रेजमहाशय इंग्रेज—इतिहासकारांतही अग्रगण्य** (आह्मां हिंदूंच्या मतें कां होईना) **कैलासवासी**–पण याही जगांतील **कायमचा रहिवासी–कर्नल जेम्स टॉड,** हा आपल्या जगन्मान्य '**राजस्थान**' नामक प्रचंड इतिहासांत सर्व इतिहासकारांस ललकारून पुकारीत आहे कीं:–"**अहो! अशा निस्सीम शौर्याचीं चित्रें! अहो! असे बेहद्द मर्दुमकीचे पुतळे! अहो! अशा अमर्याद औदार्याच्या-मूर्ति!–अर्थात् अशीं अपूर्व नरनारीरत्नें आढ-**

**ळलीं** का या **आर्यभू व्यतिरिक्त कोठें? 'होय'!** असें जर ह्मणाल—तर **"दिखाव!— आव सामने!"** ह्मणून **द्वंद्वयुद्धास सिद्ध होतो!!!"** आहाहा! केवढें हें आह्मां **हिंदुमात्रांचें महद्भाग्य!**—कीं अशा [illegible]-**विद्वान,—महाभाग,—सत्यप्रिय महात्म्याच्या, महाप्रतापशाली पवित्र लेखणीनें लेखन** झालेला तो **अद्वितीय द्वितीय भारतग्रंथ**— कीं ज्यास **'षष्ठम् वेद'** ह्मटल्यासही अपवाद येणार नाहीं—आह्मां **हिंदूंस**—आमच्या या **पडत्याकाळीं प्राप्त झाला!!!**

**बांधव हो!** केवळ आमच्या **महद्भाग्यानेंच** तें **अलभ्यफळ** आह्मांस प्राप्त झालें असें मात्र समजूं नका. आमच्यांतील **अजरामर** होऊन बसलेलीं मानवरत्नें—**वीरमणि आणि वीररमणी**—ह्यांच्या प्रेरणेनेंच ती **अलौकिक कृति निर्माण** झाली! अहो, त्यांतील एका **वीररमणी**ची अजब करणी तर पहा:—अहा! जी **राजपूतकुमारी—पत्नी** या पदास प्राप्त होते न होते आहे तोंच!—अहो जिचा **लग्नकंकणयुक्त हस्त तत्कंकणमुक्त**ही झाला नाहीं तोंच—**वीरपत्नी** या नात्यानें आपल्या **रणोद्युक्त वीरपतीस**—कीं जो **रणधीर** असूनही सजल नेत्र होत्साता, तिचा **निरोप** घेण्याकरितां, तिच्या सन्मुख उभा राहिला असतां, काय ह्मणते आहे तें पहा:—

॥ दोहा ॥

**सूरा रणमें जायके, लोहा करो निसंक।**
**ना मुहि चढे रँडापडो, ना तोहि चढे कलंक॥**

अहाहा! या **वीरदेवीमुखोद्भवसूत्रा**चा यथार्थ अर्थ करण्यास कोणी समर्थ **वीरभाष्यकार**च पाहिजे होता! पण अशाच्या

प्रस्तावना.

जेथें बुडून गडप्प होऊन जातात, त्याच गंभीर **प्रेमपयोधीं**त त्या **नरपशूं**चे घोटे देखील न भिजतां ते ( विराटदेहींच ह्मणायचे!) कोरडेचे कोरडेच बाहेर पडतात! अशा अरसिक जनांला **सतसैयाकार** बेलाशक पशुवर्गांत ढकलतात, याचें कारण ते असें सांगतातः—

**नाट्यकला सुकबित्तरस सरस राग रतिरंग।**
**अनबूडे बूडे! तरे—जे बूडे सब अंग!॥**

अर्थात् नाट्यकला, सुकवित्वरस, सरस राग, रति ( प्रेम ) रंगांत जे ( अभागी ) बुडले नाहींत ते ठार बुडाले! आणि जे सर्वांगांनीं त्यांत बुडले—ते मात्र तरले!

असो. अशा विद्याचारसंपन्न **भरतखंडां**त—अशा **सुधारणे**च्या काळीं,—**नाटकाभिरुचि** जशी असावी तशी, **विद्वत्समूहां**तही नसणें, ही एक शोचनीय गोष्ट होय! याचीं कारणें अनेक आहेत—त्यांपैकीं मुख्य कारणः—**उत्तम नाटकांची उणीव** हें होय! जरी संस्कृत पंडितांनीं **नाट्यकलेची अत्यंत** स्तुति करूनः—"**काव्यानंदः ब्रह्मानंदसहोदरः**"! आणि त्यांतही "**काव्येषु नाटकं रम्यं**" असें ह्मणून तिला **सर्वोच्चपदीं** चढविलें आहे, तरी, मार्मिकदृष्टीनें पाहिलें असतां, आमच्या **जगन्मान्यगीर्वाणवाणीं**तही **खऱ्या नाटकां**ची ह्मणून **वाण**च दिसून येते!—ज्यांचे **प्रयोग प्रेक्षणीय** होऊन, आबालवृद्धांसही **तन्मय** करून सोडतील, अशीं **चटकदार नाटकें** तींत किती आढळतील? फारच थोडीं! त्यांतही **तत्कालीन वस्तुस्थिति** यथास्थित चित्रित केली आहे, अशीं किती निघतील? एखाद दुसरें! आणि त्यांतही **शौर्यौदार्यादिसद्गुणोत्कर्षक—देशोन्नतिकारक**—अशीं किती सांपडतील?

याचें उत्तरच न दिलेलें बरें ! याच्या उलट प्रकार **युरोपखंडांत** सर्वत्र दिसून येतो:—कविवर **शेक्सपियरची वाङ्नटी** सर्व ठिकाणीं नृत्यगान करीत, सर्वांचें चित्त वेधित, सर्वांकडून 'धन्य धन्य' ! ह्मणवीत फिरत आहे ! तिची बराबरी करणाऱ्या—च कांहीं तर आपल्या **देशास ऊर्जित दशेस** आणणाऱ्या निर्माण झाल्या आहेत ! त्यांतील **मुखरीण** त्या **शार्मण्य** ( जर्मन ) **कविसिंह लयसिंहा**ची ( Lessing ) **महाप्रभावशाली नाट्यकृति** कांहीं कालामागें उदित झाली ! —कीं जिच्या **प्रभावानें** आजकालचे **जर्मन मर्द** आपणांस **जवान्मर्द वीरसिंह** ह्मणवीत गर्जत आहेत ! त्या विषयीं हल्लींच्या एका जगत्प्रसिद्ध मासिक पुस्तकांत असा जोरदार लेख आला आहे:—

+ + + Lessing's creatine power, too, was now finally set free. "Minna van Barnhelm" rose from amid the disasters and glories of that age like a vision in which the spirit of the German nation took shape before the eyes of men. More than all the victories of Frederick this noble drama gave men the right to say. There *is* then a Germany, a Teutonica Patria in these robust, war-hardened limbs, there *is* indeed a *soul.*

(from the Contemporary Review. No 332 August 1893 by T. W. Rolleston.)

असें **महाप्रभावशाली नाटक,** कीं ज्याच्या प्रभावाचा सुपरिणाम **फ्रेडरिक महाराजां**च्या सर्व **संग्रामविजयां**पेक्षांही सर्व जर्मनलोकांवर अधिक झाला होता—तें होतें तरी कशांत हो ? **गद्यांत** का **पद्यांत** ? असा प्रश्न सहज संभवतोच—तर त्याचें

उत्तरही पण सहज हेंच कीं:—त्या **कविसिंहाच्या प्रभावक गद्यांत !**—अशा **गद्यांत** कीं **ज्याच्या पुढें सुपद्यही रद्द !!!** त्या गद्या विषयींही, पूर्वोक्त महाशयाचा असा **प्रोक्त सुलेख** आहे:—

\+ + + + Here the rhymed Alexandrine is discarded and the daring experiment is made of treating a lofty tragic theme in prose. But it is Lessing's prose, a prose such as no German ever wrote before and but too few since, a prose which is swift, rhythmic, brilliant and lucid, moving with an elastic, marching stride, instead of dragging forward an unmanageable bulk in a series of tortuous Convulsions." + + + +

अशीं **वीर्यवत्** नाटकें आमच्यांत अद्याप झालीं नाहींत याचें कारण काय ? काय या **आर्यभूवर**— आह्मां **आर्यांत**ही, त्या **जर्मनमर्दा** प्रमाणें **जवान्मर्द वीरसिंह** जन्मास आले नाहींत ? शेंकडों आले !—अहो शेंकडोंच काय हजारों होऊन गेले ! असें इतिहासावरून सिद्ध होत आहे:—तो **एक मात्र इंग्रेजमहाशय इंग्रेज—इतिहासकारांतही अग्रगण्य** ( आह्मां हिंदूंच्या मतें कां होईना ) **कैलासवासी**—पण याही जगांतील **कायमचा रहिवासी-कर्नल जेम्स टॉड,** हा आपल्या जगन्मान्य '**राजस्थान**' नामक प्रचंड इतिहासांत सर्व इतिहासकारांस ललकारून पुकारीत आहे कीं:—"**अहो ! अशा निस्सीम शौर्याचीं चित्रें ! अहो ! असे बेहद्द मर्दुमकीचे पुतळे ! अहो ! अशा अमर्याद औदार्याच्या-मूर्ति !**—अर्थात् अशीं **अपूर्व नरनारीरत्नें आढ-**

**ळलीं का या आर्यभू व्यतिरिक्त कोठें? 'होय'!** असें जर ह्मणाल–तर **"दिखाव!– आव सामने!"** ह्मणून **द्वंद्वयुद्धास सिद्ध होतो!!!"** आहाहा! केवढें हें आह्मां **हिंदुमात्रांचें महद्भाग्य!**–कीं अशा **असामान्य-विद्वान,–महाभाग,–सत्यप्रिय महात्म्याच्या, महाप्रतापशाली पवित्र लेखणीनें लेखन** झालेला तो **अद्वितीय द्वितीय भारतग्रंथ**– कीं ज्यास **'षष्टम् वेद'** ह्मटल्यासही अपवाद येणार नाहीं–आह्मां **हिंदूंस**–आमच्या या **पडत्याकाळीं प्राप्त झाला!!!**

**बांधव हो!** केवळ आमच्या **महद्भाग्यानेंच** तें **अलभ्यफळ** आह्मांस प्राप्त झालें असें मात्र समजूं नका. आमच्यांतील **अजरामर** होऊन बसलेलीं मानवरत्नें–**वीरमणि आणि वीररमणी**–ह्यांच्या प्रेरणेनेंच ती **अलौकिक कृति निर्माण** झाली! अहो, त्यांतील एका **वीररमणी**ची अजब करणी तर पहाः—अहा! जी **राजपूतकुमारी–पत्नी** या पदास प्राप्त होते न होते आहे तोंच!–अहो जिचा **लग्नकंकणयुक्त हस्त तत्कंकणमुक्त**ही झाला नाहीं तोंच–**वीरपत्नी** या नावानें आपल्या **रणोद्युक्त वीरपतीस**–कीं जो **रणधीर** असूनही सजल नेत्र होत्साता, तिचा **निरोप** घेण्याकरितां, तिच्या सन्मुख उभा राहिला असतां, काय ह्मणते आहे तें पहाः—

॥ दोहा ॥

**शूरा रणमें जायके, लोहा करो निसंक।**
**ना मुहि चढे रँडापडो, ना तोहि चढे कलंक॥**

अहाहा! या **वीरदेवीमुखोद्भवसूत्रा**चा यथार्थ अर्थ करण्यास कोणी समर्थ **वीरभाष्यकार**च पाहिजे होता! पण अशाच्या

अभावीं हा शब्दार्थ पुरे:—" हे शूरा ! रणांत जाऊन आपलें शस्त्र, निःशंकपणें अस्सें चालीव कीं, **"मला वैधव्य न यावें"** आणि **"तुला कलंक न लागावा!"** अशाच **क्षात्रदेवी राजस्थानाचे इतिहासांत सर्वत्र** आढळतात !—केवढी ही जबरदस्त पुण्याई !—आणि याच **पुण्याई**चें तें **पुण्यफळ!!!** पण यावरून काय सिद्ध झालें? आह्मां **हिंदूमध्यें** जगतास चकित करून सोडण्यास पात्र अशीं **पात्रें** असूनही—तशीं **नाटकें** मात्र नाहींत ! हें ऐकून कोणी ह्मणतील कीं "नाटकें नसलीं ह्मणून नडलें काय ?—काव्येतिहास—उपन्यासादि कथांनींका तो **महत्कार्यभाग** भागत नाहीं?" याच्या उत्तरादाखल त्याच महाशयाचा आणखी एक उतारा दाखल करतों ह्मणजे बस्स आहे!

\+ + + And the discipline of the drama seems to give as nothing else cau give, a strong, athletic, sinewy fiber to the literature which has passed through it. It is easy to see how this comes about. A drama is a *doing* an action. × × ×

यावरून—**मनुष्यमात्रास अत्यंत प्रिय** अशीं **वाङ्नटीचीं नानारूपें, संसारां**तील विविध व्यक्तीचीं नानाविध चित्रें, दर्शित करण्यास पूर्ण **पात्र**, अशी **एकमात्रकृति, नाटक**च होय, हें सिद्ध झालें! ह्मणूनच माझा हा **तद्दिशादर्शक** अल्पसा **प्रयत्न** आहे.

ज्याअर्थीं कित्येक विद्वानांनीं प्रस्तुत पुस्तकाचें मार्मिक रीतीनें परीक्षण केलें आहे; व तें पुस्तकारंभींच जोडलें आहे, त्याअर्थीं त्यासंबंधीं मी कांहींच लिहीत नाहीं;—फक्त एका वादग्रस्त मुद्याचें थोडें विवेचन करितों. या पुस्तकांतील **सुमेरुसिंहा**बद्दल असा **आक्षेप** येणारा आहे कीं:—"अहो, **सुमेरसिंगानें नारायणरा-**

**वां**स काटला—हें सर्वांच्या तोंडीं असतां—येथें **तुळाजी पवार व आस्मानखान** हे त्या **पेशव्या**स काटतात हें कसें? " ही तर बुआ 'Radical Change' ऱ्याडिकल चेंज झाली (अर्थात् मूळांत फरक झाला!" ) पण मी ह्मणतों या ऱ्याडिकल चेंज ह्मणणारांस "Râjpût Spirit" राजपूत स्पिरिट ( अर्थात् राजपूती पाणी ) कोठें आहे माहीत ? ( सुमेरसिंह हा उत्तरदेशीय क्षत्रिय होता, 'राजपूत' नव्हता, पण **राजपूत**ही सचे **राजपुत्र** अर्थात् **क्षत्रिय** असल्यामुळें मीही त्यांला लोकसमजुतीप्रमाणें **राजपूत** ह्मणतों.) आजपर्यंत या विषयावर जे ग्रंथ झाले आहेत त्या सर्वांत, या **राजपूतां**विषयीं अज्ञानच दिसून येतें ! अहो एका **बी–ए–पदवीधर ग्रंथकारकृत ग्रंथां**तही—कीं ज्यांस—**दक्षिणाप्रैजकमिटीनें 'प्रैज'** दिलें आहे—**हाच गप्पागोंधळ!** कसा तो पहाः—**दादासाहेबां**नीं जेव्हां त्या **राजपूता**स निक्षून सांगितलें, कीं "अहो, मीं **'धरावा'** असें लिहिलें होतें त्यास **'मारावा'** केलें कोणी कोण जाणे ! तर तुह्मी आपल्या **खावंदां**स—अहो या **ब्रह्मबालका**स—कोणाच्या हुकमानें मारतां ? " हें ऐकतांच जेव्हां तो **राजपूत** जागच्या जागींच थिजून जातो—तेव्हां ती **कृत्या,** त्यास त्या **अमानुष कृत्या**स **प्रवृत्त** करण्याकरितां, या **दुःसह वाग्दंडा**ची योजना करितेः—

॥ आर्यार्ध ॥

**॥"मेल्या सुमेरसिंगा ! जात हरामी खरी तुझी सारी !"॥**

हाय हाय ! काय हा **मर्मभेदी फटका!** ह्मणे तुझी **जात सारी हरामी!** या **'हरामी'** शब्दाचा अर्थ तरी माहीत होता

का ग्रंथकारास ? 'हरामी' ह्मणजे **कमअस्सल!** आणि यावरही याहून जबर दुसरा **फटका** पहा:—

॥ आर्यार्ध ॥

॥"विश्वासघात करिशी बहुत तरी बाप होतरे तुजशीं !"॥

अर्थात् "तूं **बहुत बापका बेटा!" "हरामका पिल्ला !!"** पण काय चमत्कार हा !—तो जातीचा **राजपूत,** आणि कृतीनें **सिंह** असूनही तें सर्व **सहन** करतो ! काय ह्मणून ? ह्मणे तो **बेलभंडार** उचलून चुकला होता. ह्मणून ! पण त्याला कोणीं **चुकिवलें** अन् **फसविलें** होतें ? त्या **फसवी**नेंच ना ? त्याला आपल्याजवळ बोलावून आणून, गोड गोड बोलून, साखर पसरून, रडून गागून, हरतऱ्हा करून शेवटीं विश्वासघात केला त्या सरळ **शिपाईभाई**चा !—आणि इतकें करून सवरूनही, उलट तीच त्याला **दुर्वचनास्त्रा**नें ताडिते!—आणि तो **शूर** चुप्प राहतो ! हें संभवनीय तरी दिसतें काहो ? अहो लांब कशाला !—हल्लींच्या **अंग्रेजबहाद्दर**च्या **हुक्मी पलटणीं**तील एखाद्या यःकश्चित्— पण **राजपूत** शिपायाला, त्याच्या वरिष्ट अंमलदारानेंही, नुस्तें **हरामजादा** ! ह्मणूं द्या कीं पुरे!—पुरी भरलीच त्या कम्बख्त **अंमलदाराची**! मग हा राजमान्य **राजपूत-पांचहजार-गाद्यांवरील सरदारबहादर!—'जनरल'** ह्मटल्यासही चालेल! तीं दुःसह वाग्स्त्रें कशीं सहन करतो बुवा ! मोठेंच नवल हें ! "अहो नवल कसलें ! असेल तसलाच कुणी कमअस्मल !—कशाचें तरी **शिंग!—गजाऊ**नें ह्मटल्या प्रमाणें **शेंबूडशिंग!—सांबरशिंग !!"** पण असें ह्मणावें तर त्या बहुमान्य ग्रंथांत असा उल्लेख आहे !—

## प्रस्तावना.

॥ श्लोक ॥

"असे वीर बांका खरा स्वामिभक्त !
"मनाचा खरा थोर जैसा सशक्त !
"सदा सत्य बोले सदा सत्य चाले !
"जयाच्या मुळें विप्रशत्रू निमाले !"

पण अशा स्वामिभक्त सत्यवक्त्यानें अखेर स्वामिभक्ति कशी गाजविली ? त्या **कृत्येच्या वाग्दंडानें** वडविला गेल्याकारणानें तो अत्यंत **क्रुद्ध** झाला ! कोणावर ? त्या **कृत्येवर** नव्हे हो !—तर ? त्या निरपराधी **बाळराजावर** ! आणि केलेंन् काय ? त्या **बाळाचा** गळा कापला ! वड्याचें तेल वांग्यावर काढलेंन् त्या बांक्या वीरानें ! पण धन्य ह्मणायचें त्या **प्रेजवाल्या** ग्रंथकाराचें Praiseworthy प्रेजवर्दी औदार्य !—कीं असल्या **गळेकापूस**ही त्यानें आमच्यांतील—**महन्मणिमालें**त वेलाशक गोंवून सोडलेंन् ! पहा कसें तें:—

॥ श्लोक ॥

"विश्वामित्र जसा पुरातन हरिश्चंद्रास तो भोंवला !
"भोंवे कैकयि मत्सरी कुटिल ती बा रामचंद्रा तुला !
"किंवा पंडुसुतास दुर्धर जशी दुर्योधनाची मति
"हाहा आज सुमेरसिंग तुजला आणंदि दे दुर्गती !"

शाबासरे शिंगा ! दुर्गतीस जरी गेलास,—तरी **हरिश्चंद्र, रामचंद्र, युधिष्ठिरादि पुण्यश्लोक राजेंद्रांची पंगत संगत** ह्मणून नाहींच सोडलीस तूं !

असा हा पूर्वापर विरोध, मी **सुमेरुसिंहाच्या** कृतींत कोठें येऊं दिला नाहीं. तो आरंभापासून जसा **रामभक्त, स्वामिभक्त, सत्यप्रिय** दिसतो, तसाच तो आपल्या **देहांतापर्यंत** कायम राहतो ! तो खरा **स्वामिभक्त** आपल्या **स्वामीच्या रक्तानें** आपले हात विटाळीत नाहीं ते नाहींच नाहीं ! यास कांहीं

प्रस्तावना.

इतिहासाचा आधार आहे काय ? होय—आहे कांहीं ! काव्येतिहास संग्रहांत—"**नारायणराव पेशवे** यांची **बखर कारभारी पक्षाच्या हकीकतीसुद्धां**" जी प्रसिद्ध झाली आहे तींतील हा उतारा पहाः—

* * * इतक्यांत पवार व जमादार जवळ येऊन भिडले. * * * हें पाहून दादासाहेब भयभीत झाले ! गळ्यांतला हात सोडून पुढें लोटून दिला ( नारायणरावाला ) तोंच चांपाजी टिळेकर यानें नारायणरावसाहेब यांचा बंदोबस्त करावा म्हणून—अंगरख्यासुद्धां अंगावर पडला ( नारायणरावाच्या ) मग बोलला कीं " आधीं मला मारावें" असें म्हणतांच तुळाजी पवार याणें ( त्या ) दोघांचेही तीन तुकडे केले ! * * * * *

यावरून काय व्यक्त झालें ? आपल्या धन्याच्या रक्तानें आपले हात विटाळणारा **महाचांडाळ तुळ्या ऊर्फ तिरळ्याच** ठरला ! म्हणूनच त्या **मात्रागमन्यास हिंदुमात्रांच्या शापांस पात्र** करून त्याचें **तोंड काळें** केलें आम्हीं. आणि त्या **भोळ्या राजपूताच्या मूर्खत्वा**बद्दल त्याची **सरदारी** काढून टाकली. पण येवढा **अपमान त्या मानी क्षत्रियास** कुठला खपायला !—त्यानें आपल्याच हातानें आपला **शेवट** कसा करून घेतला, हें शेवटच्या पृष्ठावर पहा. आतां याउपरही कोणी तो दोष ( Radical Change ) आमच्या माथीं लादूं पाहीलच तर त्यास येवढेंच सुचवितों कीं:—**हें नाटक आहे बरें का दादा! इतिहास नव्हे !**

असो. आतां इतकेंच म्हणून संपवितों, कीं ज्या **महाशयांनीं** आपला अमूल्य वेळ खरचून, या पुस्तकाचें परीक्षण लक्षपूर्वक करून, आपले लेखी अभिप्राय मला दिले, त्या सर्वांचें मी अभिनंदन

करतों; आणि ज्या **महानुभावांनीं** प्रस्तुत पुस्तकाचें **निरीक्षण** परीक्षण करूनही, **वर धन** देऊन माझा उत्साह **वर्धन** केला त्यांचे मी प्रेमपूर्वक **धन्यवाद** गातों. त्या **महानुभावांत अग्रगण्य**—कीं ज्यांनीं मला प्रथम आश्रय दिला—**श्रीमद्विद्याचारसंपन्न सुजन श्रीमन्नारायणराव बाबा साहेब घोरपडे इचलकरंजी संस्थानाधीश** हे होत. आणखी आमचे **लोकप्रिय श्री करवीरराजसभासभासद मेहरबान मेहरजी कुंवरजीभाई सी. ऐ. ई. दिवाणसाहेब, मेहरबान रावबहादूर बळवंत नारायण जोशी सरन्यायाधीश साहेब,** आणि **मेहरबान रावबहादूर राजाराम खंडेराव वैद्य सरसुभे साहेब हे होत.**

आपला आश्रित,

**ग्रंथकर्ता.**

# OPINIONS.

॥ श्री ॥

रा० रा० रायसिंह रावजी यांनीं केलेलें "श्री० नारायणराव पेशवे यांचा वध—अथवा आनंदीबाईचें अजब कारस्थान" या नाटकांतील बरींच प्रकरणें पाहिलीं. नाटक फार सुरस आहे. त्यापासून रायसिंहरावजी यांचें व्रजभाषादिक उत्तर देशींच्या भाषा व महाराष्ट्र भाषा यांतील प्राविण्य आणि नाट्यकलेचें ज्ञान हीं फार व्यक्त दिसून येतात. असे ग्रंथ महाराष्ट्र भाषेंत होणें फार इष्ट आहे.
आषाढ शुद्ध ११.

(सही.) **शि० बा० परांजपे, बी० ए०,**

व्हाइस प्रिन्सिपाल, राजाराम कालेज,
कोल्हापूर.

---

*Kolhapur 4th August 1893.*

I had great pleasure in reading Rayasinhrao's "Narayanrao Peshwa." The charming play is full of vigour and spirit, and depicts the extraordinary and bewildering incidents with admirable delicacy and tenderness. The devilish machinations of Anandibai, conjuring and ensnaring the noble and high-souled Sumer, are painted with a sure hand; and the characters have a rare vivacity and colour about them. The book has a delightful freshness of diction and abounds in the finer graces of literature. The alliterations have a beautiful effect, especially, in the jeerings and goadings of Gaji. The book is marked on every page by distinction

and quality and is so excellent that I may call it finished and almost perfect.

(Sd.) RAGHUNATH NARAYAN APTE,

M. A. L. L. B.,

Professor of Mathematics,

Rajaram College.

---

I had the pleasure of reading a manuscript copy of Rayasinhraos "Narayanrao Peshwa" or "The wonderful machinations of Anandibai." In every way it is one of the best Historical plays yet written in the Marathi language, and in some respects it excels them all. The author is a master of Urdu and its kindred languages, and he has enriched his production with a style and diction which render it a work of high literary merit, though at the same time the more difficult of comprehension and acting on a Marathi stage.

In point of conception and development, the character of Anandibai would do credit to any dramatic artist. Opening with her soliloquy which foreshadows the felt determination of purpose that being fed and kindled by the goadings of her friend-servant Gaji in the first and the following acts, reaches its culmination in the fourth. The whole play is chiefly a development of ideal villany into a practical consummation which is an historical fact. The plottings and insinuations

by means of which Anandibai inveigles Sumersing into her snare and the mental confusion and struggle of the latter are portrayed in a manner that prove the dramatic genius of the author.

While devoting all his resources of language and imagination to the perfection of his central character, the author has not neglected to suggest in an appropriate manner how the vacillation and want of mutual confidence among the statesmen of the time aided to ripen the schemes of Anandibai, and also to show how the weakness of her husband Raghobadada emboldened her to convert धरावा into मारावा, and how even at the last stage when the whole plot was threatened with collapse by Narayanrao's escaping and falling into the arms of Raghobadada for rescue, it cowed down before the arch fiendish spirit of Anandibai who ordered the very hands that protected Narayanrao to be cut off. The scenes which describe the burning jealousy of Anandibai towards Gangabai, the wife of Narayanrao Peshwa, and the deep anxiety of the latter for the safety of her husband, aptly depict the adverse sides of female character.

The various beauties of language, the puns and allegories, the wits and vulgarisms, as well as the force and softness of the different speeches would make the reading pleasant to the learned as well as the illiterate. The publication of this book

would be a very valuable addition to the Marathi literature.

(Sd.) VISHWANATH BALLAL GOKHALE,
B. A. L. L. B.,
District Magistrate and
Assistant Judge, Kolhapur.

*27th July 1893.*
*Kolapur.*

---

*Kolhapur 7th August 1893.*

My dear sir,

I listened to portions of your play read by yourself and have not the least hesitation to say I never derived greater pleasure from any other Marathi pieces. Your plan is admirable especially as it seems to be an improvement on all attempts made hitherto to handle the inspiring subject of the murder of that famous Maratha Arthur. It is no wonder that your historical conscience is offended in the extreme when such glorious opportunities to show dramatic talent have been marred by inferior hands. Your knowledge of history combined with your creditable acquaintance with the languages concerned, marks you as a fit person to do justice to the melancholy tale of Narayanrao's death and to many other stories of our great ancestors. You seem to possess the necessary genius and this fact with the considerations indicated above, encourages me to sound the note of joy in order to announce to the Marathi readers, the appearance of an eminent dramatist among them. It will perhaps be presumptuous to string your

name with the mighty names of other nations but what looks so to-day will be a matter of course after to-day.

It is to be regretted that the enviable benefit of listening to you personally reading the play, cannot be within the reach of many. How happy were the Greeks in this respect who heard at the national festivities held at regular intervals the best productions read out by the authors themselves. It was no small gratification to the author thus to read his works to the assembled Greeks, and it is to be sure a great honor to him. It is not too much to say that you are entitled to this. The book is not and cannot be half so delightful as when thus enjoyed—the nectar just dropping from the living fountain, rather than stored in the dead cups of foolscap printed pages. I wish every success to your literary efforts.

Yours sincerely,

(Sd.) VISHNU GOVIND BIJAPURKAR, M. A.
Ghorpade Lecturer,
Rajaram College, Kolhapur.

---

I have carefully read Mr. Raisinhrao Deva's play named "the wonderful machinations of Anandibai, or the murder of Narayanrao Peshwa." I think it is a well conceived and well executed play. The diction is beautiful and charming. The different characters are carefully studied and developed. The author has successfully exhibited his

mastery of the Marathi, Urdu and Hindi languages and his knowledge of the several dialects of the last. In short I have no hesitation in saying that the book deserves to be ranked with the best of its kind.

(Sd.) BALWANT NARAYAN JOSHI,

*Kolhapur,* } B. A. LL. B. Chief Judge,
*31st August 1893.* } Kolhapur.

---

*Kolhapur 11th August 1893.*

My dear Raosaheb.

I have gone carefully through your charming little play "Narayan Rao Peshwa Natak" and I found it most captivating. The order in which you have introduced the characters and the way in which you have made them speak is natural and holds the attention of the reader as it were spell-bound. The skill of the author of such works, as the one you have so ably written, consists, as every true critic knows, in making his *dramatis personœ* talk in character. We sometimes find authors putting refined sentiments and cultured language in the mouths of persons who by the nature of their association and the position they hold in society, are quite incapable of such thoughts and language. While persons from whom we are led to expect wisdom, noble sentiments and good manners, are represented to us as so many fools, speaking polished language no doubt, but utterly devoid of practical common sense. Not to

mastery of the Marathi, Urdu and Hindi languages and his knowledge of the several dialects of the last. In short I have no hesitation in saying that the book deserves to be ranked with the best of its kind.

(Sd.) BALWANT NARAYAN JOSHI,

*Kolhapur,*
*31st August 1893.* } B. A. L. L. B. Chief Judge,
Kolhapur.

---

*Kolhapur 11th August 1893.*

My dear Raosaheb.

I have gone carefully through your charming little play "Narayan Rao Peshwa Natak" and I found it most captivating. The order in which you have introduced the characters and the way in which you have made them speak is natural and holds the attention of the reader as it were spell-bound. The skill of the author of such works, as the one you have so ably written, consists, as every true critic knows, in making his *dramatis personæ* talk in character. We sometimes find authors putting refined sentiments and cultured language in the mouths of persons who by the nature of their association and the position they hold in society, are quite incapable of such thoughts and language. While persons from whom we are led to expect wisdom, noble sentiments and good manners, are represented to us as so many fools, speaking polished language no doubt, but utterly devoid of practical common sense. Not to

speak of farseeing statesmanship and well grounded knowledge of events, but such is not the case with your excellent book. Every character speaks the language commonly used by the class to which he or she belongs, and you have put only such sentiments in the mouths of your characters as are generally shared by the class to which they belong. This is no small merit in my opinion, and it will secure you a very high place in the list of eminent authors.

You have sustained the spirit of the play well throughout, so that the interest of the reader never flags and he is continually urged on to know what follows next. I wonder whether the audience will cheerfully submit to the delay which intervenes when one act ends and another begins. The play is a masterpiece of its kind and it will be a real pleasure to see it on the stage.

I offer a double welcome to your book on two grounds :—for the solid merit of the work itself, and the scientific way in which you have treated the subject in hand as well as for the hope that it will go a long way in putting effectual stop to those hasty and indiscriminate productions which make our educated classes so averse to read any Marathi works of this sort. Judging from merits of your play, I may safely say that your play will supercede all others, dealing with this episode and hope that it will hold the field for many a day to come.

You wield the languages Marathi, Hindi,

and Urdu with exquisite grace and purity and have clearly illustrated the difference between the two latter (in the characters of Sumerusimh and Asmankhan) which are generally hopelessly intermixed by authors, in portraying gentle feelings which appeal to our tender sympathies or in giving expression to manly qualities which inspire us with courage and stir us to action, you are equally in your element. The gentle arts of seductive persuasion practised by Anandibai and the vigour with which Sumeru revolts from them have been depicted with a master hand. In the delineation of character, I can say with confidence that you stand ahead and shoulders above all Marathi writers whom I have known. Your wily Gajâu is a real living Gajâu inhabiting the world we see and not merely the imagination of a poet. The more we read the more we begin to appreciate your work; each addition at perusal of it discovers some new hidden beauty. How cunning and intriguing is Gaji painted, with what skill does she lay the threads of the plot! With a few masterly strokes of your pen you have laid bare before us in the persons of Gaji and Anandibai, the weaknesses of women who have not been taught to exercise wholesome restraint on their vanities, and who give the rein to their selfish thoughts and inordinate ambition. While in Raghobadada we see the glorious and promising career of a simple, honest and straightforward soldier wrecked on the rock of his wife's selfishness, intrigues, and cruelty. You have so skilfully arranged the plot that

we are all naturally led to place all our sympathies on the side of Raghobadada and Sumeru, while we reserve for Anandibai and Gaji our unmitigated contempt and hatred. In Sumerusimh instead of seeing a human monster which he is painted to be by previous authors, we see a brave, impulsive and God-fearing soldier, or to quote the words of the play " A Vastadji and a Guruji" combined in one.

I conclude by saying that this work has enriched the Marathi literature and trust that it will be a forerunner of several others from the same eloquent pen.

I remain,

My dear Raosaheb,

Yours very sincerely,

R. R. SHIRGAONKAR, B. A. L. L. B,

Government Prosecutor,

Kolhapur.

---

*Kolhapur 17th August 1893.*

Having listened with great pleasure to portions of *Râyasinhrao's* Narayan Rao Peshwa or the wonderful machinations of Anandibai, read by the author himself, I have no hesitation in fully endorsing the opinions expressed on its merits by Messrs. Apte, Gokhale, Shirgavkar, Bijapurkar and others. Mr. *Rayasinhrao* must have taken immense trouble in collecting materials from Bakhars and other old documents for the play

which he has written in excellent style. I have no doubt that the work when published, will deserve the patronage of all lovers of Marathi literature. I wish the author every success.

(Sd.) KUVERJI C. I. E.

Divan of Kolhapur.

---

I have some portions of Mr. Rayasinhrav's "Narayanrao Peshwa Natak" read to me. I never felt tired while it was being read to me. Every page gave me new delight and pleasure. The style of the drama is very simple but interestingly impressive. The diction is excellent. The author seems to have a very good command on the Urdu and other languages. He has made it very interesting, but has not left out the main historical facts. They are mentioned in the chronological order as much as he could. It is a masterpiece of its kind. The descriptions are very lively. All the sentiments have been very well depicted, but the sentiments of mercy have crowned them all. Several scenes given in it are very pathetic. This tragical play no doubt will move the passions even of the iron-hearted. In conclusion I very heartily commend it to every reader of the Marathi *Dramatic literature.* I sincerely trust that it will meet with the approval of the Marathi reading public at large. I wish every success to the author in his future attempts.

*30th August 1893.* (Sd.) R. K. WAIDYA,

*Sirsubhe-or chief Revenue officer Kolhapur.*

Mr. Rayasinhrao Narayan of the State P. W. D. Kolhapur, has read out to me select portions of his "Assassination of Narayanrao Peshwa," and I have great pleasure in adding my humble testimony to several others, already in his possession, about the excellence of his production. Though his is not the first attempt to dramatise that tragic episode in the history of the Peshwas, Mr. Rayasinhrao's scholarly knowledge of Urdu and Hindi gives his work an advantage over its predecessors, to say nothing of the remarkable command of Marathi, which he displays notwithstanding that it is to him virtually a foreign language. The plot is well developed, the delineation of character is skilful, and the words put into the mouths of the *dramatis personœ* thoroughly weighed. He also appears to have taken pains to verify from old Bakhars and other historical records the most important incidents in the play, some of which will be new to many readers. To say that the book will be able to find its place among the masterpieces of Marathi dramatic literature, is to pay Mr. Raisinhrao a compliment which I think he has shown himself entitled to.

(Sd.) V. K. KIRTIKAR, B. A.,

*Kolhapur,*<br>*20th August 1893.*

Deputy Educational<br>Inspector, Kolhapur.

---

॥ श्री ॥

कोल्हापूर ता० ८।८।९३.

रायसिंहराव देवकृत "श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध— अथवा आनंदीबाईचें अजब कारस्थान" हें नाटक मीं समग्र वाचून पाहिलें. या नाटकाच्या संविधानकाची रचना उत्तम साधली आहे. आजपर्यंत ह्या अघोर व अमानुष ऐतिहासिक कथानकाचे रंगभूमीवर जे प्रयोग मीं पाहिले त्या सर्वांची रचना ह्यापुढें **सूर्यापुढें काजव्यासारखी फिकी पडते?**

पात्रांच्या स्वभावाचें वर्णन फार नामी उतरलें आहे. मत्सर व महत्वाकांक्षा यांनीं परवश झाल्यामुळें आनंदीबाईचे ठायीं उत्पन्न झालेली क्रूरता व बेपरवाई,—गजीदासीमध्यें कमजात बायकांचीं नैसर्गिक कुटिलता, **दादां**चा साधेभोळेपणा, औदार्य, व स्त्रीवशता; सुमेरुसिंहाची राजनिष्ठा—रामभक्ति, अप्रतिम शौर्य, विषयानासक्ति,—व राजपुत्रास विशेष अशी पूर्णत्वानें वसणारी **वचनभंगभीरुता**; व राक्षस यवन **आस्मानखां** याचा द्रव्यलोभ, स्त्रीलंपटपणा व अधमत्व इत्यादि उत्तमच वठलीं आहेत.

ह्या नाटकांत **वीर** व **करुण** हे दोन रस प्रधान आहेत. एक दोन ठिकाणीं शृंगाररसानेंही आपल्या मोहकरूपाचा आविर्भाव केलाच आहे. चवथ्या व पांचव्या अंकांत तर **करुणरसा**चा कळस झाला आहे. ते ते भाग वाचून ऐकून व पाहून ज्याला द्रव येणार नाहीं, त्याला सहृदयता नाहीं हें खास. **सुमेरुसिंह** ह्मणजे साक्षात् वीररसच तो. तेव्हां वीररसाचा पूर्णविकास झाला आहे ह्मणणें ह्मणजे पुनरुक्ति होय.

भाषा तर फारच चटकदार व जोराची आहे. अर्थभंग होऊं न देतां, अनुप्रासांची तर रेलचेल उडवून दिली आहे. पात्रांस व प्रसंगास अनुरूप अशीच भाषा सर्वत्र घातली आहे.

एकंदरींत—**महाराष्ट्रनाट्यग्रंथमालेचा** हा **मेरुमणिच** आहे—ह्मणजे नाटकास आवश्यक अशा सर्व गुणांनीं युक्त नाट्यग्रंथ मराठींत माझ्या वाचनांत यासारखा दुसरा आलेला नाहीं.

(सही) **हरि भिकाजी करमरकर, बी. ए.**
असिस्टंट मास्तर, राजाराम हायस्कूल, **कोल्हापूर.**

---

॥ श्री ॥

रायसिंहरावजीकृत "श्री० नारायणराव पेशवे यांचा वध" हें नाटक पाहून मला फार आनंद झाला. या ऐतिहासिक कथाभागावर आजपर्यंत बहुत लोकांनीं नाटकें लिहिलीं आहेत; परंतु त्यांपैकीं एकाचीही या अत्युत्तम ग्रंथाशीं तुलना होत नाहीं. ...............

प्रस्तुत पुस्तकांतील संविधानक जरी सरळ आहे, तरी तें इतकें हृदयंगम वठलें आहे कीं-पेशवाईच्या अंतिम निकृष्ठ स्थितीचें हुबेहूब चित्रच पुढें उभें राहिलें आहेसें दिसतें. ..................

सारांशः—हा ग्रंथ मराठी भाषेस एक अमूल्य भूषण झाला आहे. याचें भाषासौंदर्य आणि रचनाचातुर्य हीं अपूर्व आहेत.

करवीर,
मिति आषाढ कृष्ण ६
शके १८१५.

(सही) **गणेश शास्त्री रुकडीकर,**
संस्कृताध्यापक, राजाराम कालेज, **करवीर.**

---

Mr. Rayasinhrao Narayan has read out to me select Urdu portions of his drama "Narayanrao Peshwa" and I have much pleasure in testifying to his full command over Urdu language, in which he expresses himself with remarkable skill and facility. The style is not only syntactical but also idomatic. The insertion of appropriate Persian verses and proverbs in some of the scenes, has the

effect of enhancing the beauty of other finer graces of literature.

I also had the pleasure of hearing Urdu pieces of another play called "Shivaji" (a portion of which is not yet complete) read by the author himself and I have no hesitation in saying that this part of Maratha country, which is not considered a seat of Urdu and Persian learning, may be proud of having such an eminent dramatist, well versed in so many languages.

I am particularly much pleased with the way of Mr. Rayasinhrao's reading his drama. His dramatic way of reading is indeed highly pleasing and convinces the listener of the logicality and truth of the proposition,—the well known Persian aphoristical maxim.

"Tasannif râ Musannif neko kunad bayan"
तसन्निफ रा मुसन्निफ नेको कुनद बयान.

I heard specially with attention and interest the conversation of Aurangzeb and Diler Khan and was much delighted ......................................

Mr. Rayasinhrao's charming play on the contrary, being full of true historical facts, is rather a useful machine for awakening the dormant interest of the hearers or readers for the study of history in addition to its being full of puns and allegories, proverbs and idioms, wits and retorts and many other literary beauties.

The scenes, which last of all, Mr. Rayasinhrao read out to me, depict the picture of Purbia Naiks

and soldiers and their conversation in vulgar Hindustani language with Asman Khan. These scenes in fact combine instruction with amusement and are sure to render, the performance of the Play, on the occasion of its being brought on the stage, equally pleasant, both to literary men and the illiterate.

I wish every success to his literary efforts.

(Sd.) NIZAMUDDIN AHMED B. A.,

*Kolhapur,*
*2nd September 1893.*
Lecturer in Logic & Persian
Rajaram College.

---

My dear Babasaheb,

Mr. Rayasinhrao brought me his play and the favourable opinions on it this morning, and I told him we would arrange for acting it at the College-beginning rehearsals after the University Examinations are over. × × × × × × ×

*Kolhapur Sun:*
*27th September*
*1893.*
Yours sincerely,
(Sd.) C. H. CANDY,
Principal Rajaram College,
Kolhapur.

---

# इंग्लिश मतांचीं भाषांतरें.

रायसिंहरावकृत "श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध" हें नाटक वाचून मला फार फार समाधान वाटलें. हें मनोहर नाट्य आवेश आणि उत्साह यांनीं ओतप्रोत भरलें असून त्यांत अ[illegible]तील आणि भ्रामक गोष्टी मोठ्या मार्मिकतेनें आणि मार्दवानें [illegible]षीं का- आहेत. आनंदीबाईच्या कृष्णकारस्थानाचें सर्वोत्कृ[illegible] अविद्वान थोर व उदार अंतःकरणाच्या सुमेरुसिंहास ती [illegible]—हें पुस्तक

**कपटचातुर्यजालां**त कशी बद्ध करिते; आणि त्याजकरवीं आणक्रिया करवून त्या दुष्कृत्यास कसें उत्तेजन देते, हें यांत-उत्तम तऱ्हेनें चित्रित झालें आहे! पात्रांच्याठायीं कांहीं अपूर्व औत्सुक्य आणि स्वभाव-वैचित्र्य हीं दिसून येतात!! पुस्तकाच्या भाषाशैलीमध्यें विलक्षण माधुर्य असून शब्दार्थालंकारादि **साहित्यरत्नें सर्वत्र चमकत आहेत**! अनुप्रासांनीं तर **बहार** करून सोडली आहे-विशेषेंकरून **गजी**च्या चिथावणींत आणि उठावणींत ते फारच खुलतात! सारांशः-प्रस्तुत पुस्तकाच्या प्रत्येक पृष्ठांत कांहीं ना कांहीं तरी चमत्कारिक व मनोहारक प्रकार दृष्टीस पडतातच! एकंदरींत पहातां, हें पुस्तक इतकें चित्तवेधक बनलें आहे कीं, यास मी-**सर्वगुणालंकृत** आणि बहुतेक **पूर्ण** असें बेलाशक म्हणतों.

(सही) **रघुनाथ नारायण आपटे,**

**कोल्हापूर,**
ता० ११ आगस्ट।९३.

**एम्. ए. एल्. एल्. बी.**
मुंबई युनिव्हरसिटीचे माजी फेलो आणि हल्लीं
राजाराम कालेजांतील गणिताचे प्रोफेसर.
(गणिताध्यक्ष.)

---

रायसिंहरावकृत "श्रीमंत नारायणरावपेशवे यांचा वध-अथवा आनंदीबाईचें अजब कारस्थान" या नाटकाची हस्तलिखित प्रत वाचून मला आनंद झाला. कोणत्याही तऱ्हेनें पाहिलें असतां हें नाटक **महाराष्ट्रभाषेंत** जीं उत्कृष्ट नाटकें आहेत त्यांत गणलें जातें, इतकेंच नाहीं-तर कांहीं गुणांत त्या सर्वांवर ताण करतें. ग्रंथकार हे **उर्दू** आणि तज्जातीय इतर भाषांचे **गुरु** आहेत; आणि त्यांनीं idiomची कृति अशा चटकदार भाषासरणीनें आणि शब्दालंकारांनीं शृंगारली आहे, कीं ती **साहित्यशास्त्र**दृष्ट्या फार उत्कृष्ट ठरते-तरी तिचें यथार्थ स्वरूप लक्षांत येणें आणि तिचा प्रयोग **महाराष्ट्ररंगभूमी**वर चांगला वठणें-हीं कठीण आहेत.

आनंदीबाईच्या स्वभावाचें स्वरूप इतक्या मार्मिकतेनें रेखिलें आहे, कीं तें कोणत्याही उत्तम नाट्यग्रंथकारांच्या उत्तम कृतींशीं तुललें जाईल! तिचें प्रथमचें **आत्मगत भाषण**—कीं ज्यांत तिचें आकाशपाताळ एक करणारें **कृष्णकारस्थान** प्रगट होतें आहे—व ज्यास तिच्या प्रिय दासी ऊर्फ **सईबहिणी**च्या चिथावणीची भर पडून, तें प्रथमांकापासून तों तडक चतुर्थांकापर्यंत भडकत जाऊन शेवटीं पूर्ण प्रज्वलित होऊन, एका कल्पित **राक्षसी कृती**ची-खरी **प्रलयमूर्त्ति** बनते—(कीं जी इतिहासांत खरीखुरीच घडलेली आहे!) आनंदीबाई साखर पसरून, आपल्या कपटचातुर्यजालांत **सुमेरुसिंहास** कशी पकडते; नंतर त्या सिंहाची धडपड पाहून ती कशी गडबडते; व तो सिंह त्यांत पुरा सांपडल्यामुळें कसा तडफडतो; यांचीं हुबेहूब चित्रें या **नाट्यचित्रकारानें** इतकीं **सुरेख** काढलीं आहेत कीं तीं पाहून **"उपजत अंगसुभाव"** हा गुण ग्रंथकारांत स्वभावसिद्ध आहे असें सिद्ध होतें! ..................................

...............................................................................

आनंदीबाईचा गंगाबाईच्या **वैभवा**विषयींचा विलक्षण **हेवा**—आणि गंगाबाईची केवळ आपल्या पतीच्या जिवाच्या बचावाबद्दलची विलक्षण काळजी—हीं या स्त्रीद्वयाच्या विरुद्धस्वभावांचीं चित्रें बहुत खुब्यांनीं चित्रित केलीं गेलीं आहेत!

एकंदरींत:—प्रस्तुत पुस्तकांतील भाषासौंदर्याचे अनेक प्रकार—अर्थात् **शब्दश्लेष**, रूपकें, बोलण्यांतील पकडी, अडाणी भाषेंतील लाक्षणिक बोल, तसेंच निरनिराळ्या भाषणांतील प्रसंगविशेषीं काठिन्य आणि मार्दव; हीं वाचून व ऐकून—विद्वान काय व अविद्वान काय सर्व लोकांस आनंद होईलच होईल! सारांश:—हें पुस्तक

छापून प्रसिद्ध झाल्यावर मराठी भाषेच्या साहित्यभांडारांत याची एक अमूल्य भर पडेल.

(सही) **विश्वनाथ बल्लाळ गोखले,**
**बी. ए. एल्. एल्. बी.**

**कोल्हापूर,**
ता० २७ जुलै सन १८९३. } डिस्ट्रिक्ट माजिस्ट्रेट, कोल्हापूर.

---

माझे प्रिय महाशय!

आपण आपल्या नाटकांतील (अर्थात् नारायणराव पेशवे यांचा वध यांतील) कांहीं भाग मला वाचून दाखविले; ते ऐकून मला जो आनंद झाला त्यापेक्षां इतर कोणत्याही मराठी रचनेपासून जास्त झाला नव्हता—असें ह्मणण्यास मला मुळींच हरकत दिसत नाहीं. ........................... आपल्या ऐतिहासिक ज्ञानामध्यें—प्रस्तुत विषयास अवश्य अशा आपल्या **अनेकभाषापटुत्वाचें** सम्मेलन झाल्यामुळें, त्या हृदयविदारक कथानकाचें-अर्थात् **श्रीमंत नारायणराव पेशवे** यांच्या वधाचें—नाटक करण्यास;—व आपल्या थोर पूर्वजांची थोरवी गाण्यास योग्य असा जो दुर्मिळ गुण:—**"उपजत अंगस्वभाव"** तो आपल्या अंगीं असल्यामुळें आपण लायक दिसत आहां. हें लक्षांत येऊन मला अशी आनंदाची टिमकी पिटण्यास उत्तेजन येतें कीं:—"अहो महाराष्ट्रभाषावाचनप्रिय जन हो! आपल्यामध्यें एक महान् नाट्यग्रंथकार विराजमान झाला आहे हो!" आपलें नांव इतर राष्ट्रांतील **महन्मणिमालेंत** गोवणें हें जरी संप्रति अत्युक्त दिसेल—तरी तें आज नाहीं उद्यां—त्या मालेंत ह्मणून गुंफलें जाणारच! आपल्या तोंडांतून ती आपली रचनावाग्देवी कशी बोलते हें ऐकण्याचा प्रसंग थोड्यांस येईल ही एक शोचनीय गोष्ट होय! ........................................

आपलें पुस्तक आपल्या तोंडून वाचलें गेल्यानें तें जितकें मनोवेधक होताहे, त्याच्या अर्ध्यानेंसुद्धां तें इतरांच्या वाचनापासून

होणार नाहीं हें खास. **अमृत** आपल्या निर्झरांतून झरत असलेलें अधर धरून प्राशन केलें असतां, जितकें मधुर लागेल, तितकें तें कागदांच्या प्याल्यांत सांठवून ठेवलेलें प्याल्यानें कसें लागणार! मी इच्छितों कीं आपल्या अशा **साहित्यकृत्यांस पूर्ण यश येवो**!

कोल्हापूर,
ता० ७ आगष्ट सन।९३.

आपला खरा,
**विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.**
घोरपडे लेकचरर, राजाराम कालेज.

---

मिस्तर रायसिंहराव नारायण देवकृत **श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा** वध अथवा **आनंदीबाईचें अजब कारस्थान**-हें **नाटक** मीं लक्षपूर्वक वाचिलें. या नाटकाची योजना आणि रचना हीं चांगलीं साधलीं आहेत.—भाषाशैली सुंदर व मनोहर आहे.- निरनिराळ्या पात्रांचें स्वभाववैचित्र्य आणि त्यांची भाषणपद्धति हीं पात्रानुसार फार विचारपूर्वक दर्शित झालीं आहेत. यांत ग्रंथकारानें आपलें **मराठी, उर्दू** आणि **हिंदी** या भाषांतील प्राविण्य फार उत्तम रीतीनें व्यक्त केलें आहे; व याशिवाय **हिन्दीभाषांतरगत-अनेक-उपभाषांचेंही** ज्ञान चांगलें दाखविलें आहे. सारांशः—सर्वोत्कृष्ट नाट्यग्रंथमालिकेंत याची गणना करण्यास मला कांहीं दिक्कत दिसत नाहीं.

कोल्हापूर,
ता० ३१ आगस्ट
सन १८९३.

(सही) **बळवंत नारायण जोशी,**
**सर न्यायाधीश. बि. ए. एल्. एल्. बी.**
करवीर राजसभासभासद (कौन्सिलर.)

---

माझे प्रिय रावसाहेब,

आपलें मनोरंजक छोटें नाटक-"श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध" हें मीं लक्षपूर्वक समग्र वाचलें—व तें अतिशय मनोहर आहे

असें दिसून आलें. आपण आपलीं पात्रें अशा मोहक तऱ्हेनें बनविलीं आहेत आणि त्यांच्या मुखीं अशीं खुबीदार भाषणें घातलीं आहेत कीं, तीं वाचतांच वाचकाचें सर्व भान नाहींसें होऊन, तो जणों जादूनें भारल्याप्रमाणें तल्लीन होऊन जातो! ...............

आपल्या या पुस्तकास मी दुहेरी मान देतों—याचीं कारणें दोन आहेत:—पहिलें—हें पुस्तकच खऱ्या **भरींव** गुणांनीं भरलें आहे. दुसरें-या पुस्तकांतील विषय आपण दूरवर विचार करून, शास्त्रीय रीतीनें-इतके सरस वर्णन केले आहेत कीं, ते पाहून—**ग्रंथकार होऊं पहाणाऱ्या**—अविचारी अविद्वान लोकांचें धाबें दणाणून जाऊन, ते यापुढें आपले अप्रयोजक **गाबाळग्रंथ** पुढें आणणार नाहींत! व येणेंकरून **विद्वत्समूह**-जो **महाराष्ट्रनाट्यग्रंथवाचनविन्मुख** आहे तो **सन्मुख** होईल! असे असे गुण पाहून मी बेलाशक सांगतों कीं, हा आपला **नाट्यग्रंथ इतर सर्व** मराठी नाटकांस मागें **हटवून**, आपण **पुढें** सरून, सर्वांस **आवडता** होऊन, **चिरायु** होणार!

आपणांस **मराठी, हिन्दी** आणि **उर्दू** या भाषा इतक्या अनुकूल आहेत कीं, त्यांजकरवीं आपण हवी ती **मौज** करवितां. आपण **हिन्दी** आणि उर्दू-हे दोन-**हिन्दुस्थानी भाषेचे मुख्य भेद**-सुमेरुसिंह आणि आस्मानखान यांच्या पात्रांत **स्पष्टपणें** दर्शित केले आहेत. हेच **भेद** इतरांच्या कृतींत **"सब एकंकार"**! होऊन गेले आहेत. आपण जसें **करुणरसांत** आमच्या हृदयांस द्रव आणून तीं वितळवून सोडतां, तसेंच **वीररसांत वीरश्री** उत्पन्न करून आमचे बाहु स्फुरण करवितां! या दोन्ही विरुद्ध कृतींचे आपण **वस्ताद** आहांत! आनंदीबाईचें पर मन वश करणारें कपटयुक्त मधुर भाषण; आणि सुमेरुसिंहाचें आवेशयुक्त जोरदार तिचा सर्वस्वी धिक्कार करणारें भाषण-हीं खरोखर आपल्या वस्तादी हातच्या उमद्या तसबिरी होत! ........................................

काय सांगावें !-हें आपलें पुस्तक जों जों वाचावें तों तों तें अधिकाधिक प्रिय होत जातें ! हरएक वाचनांत कांहीं ना कांहीं तरी गुप्त-भाव व्यक्त होतातच ! आहा ! ती सुतानें स्वर्ग गांठणारी **गजीची मूर्ति** किती हुबेहूब उतरली आहे ! ती आपल्या बोलींत त्या **कृष्ण-कारस्थानाचा पाया** किती खुबीनें घालते ! ..................

सारांश:-मी इतकें ह्मणून संपवितों कीं—या पुस्तकाच्या भरीनें मराठी साहित्यास उत्तम शोभा आली आहे. आणि शेवटीं मी आशा करितों कीं—अशींच अनेक पुस्तकें-त्याच बहाद्दर कलमाकडून लेखन होवोत ! आणि हें पुस्तक त्यांचा पुढाईत बनो !

कोल्हापूर,
ता० ११ आगष्ट सन १८९३.

(सही) **रामचंद्र रघुनाथ शिरगांवकर. बी. ए. एल्. एल्. बी.**
सरकारी वकील.

---

रायसिंहरावकृत **श्रीमंत नारायणराव पेशवे** अथवा **आनंदीबाईचें अजब कारस्थान**—या नाटकांतील कांहीं वेंचक प्रकरणें ग्रंथकार यांनीं स्वतः आह्मांस वाचून दाखविलीं. तीं ऐकून आह्मांला मोठा आनंद झाला. प्रस्तुत नाटकाच्या उत्कृष्ट गुणांबद्दल रा० रा० आपटे, गोखले, शिरगांवकर, विजापूरकर आणि इतर विद्वानांनीं जीं उत्तम मतें दिलीं आहेत त्यांस माझी पूर्ण संमति आहे. मिस्तर रायसिंहराव यांस, या चित्तवेधक ग्रंथरचनेसाठीं; अनेक ऐतिहासिक ग्रंथ, जुन्या बखरी, जुने हस्तलिखित कागदपत्र वगैरे धुंडाळतांना बहुत श्रम घ्यावे लागले असावेत. मी निःसंशयपणें ह्मणतों कीं, हें पुस्तक छापून प्रसिद्ध झाल्यावर, सर्व **महाराष्ट्रभाषाप्रियरसिकाश्रयास पात्र** होईल. ग्रंथकारांस पूर्ण यशप्राप्ति होओ असें मी इच्छितों.

**कोल्हापूर,**
ता० ७ आगस्ट
सन १८९३.

(सही) **मेहरजी कुवरजी सी. ऐ. ई.**
दिवाण निसबत सरकार करवीर,
करवीरराजसभासभासद (कौन्सिलर.)

---

मिस्तर रायसिंहराव यांच्या **"श्रीमंत नारायणराव पेशवे"** या नाटकाचे कांहीं भाग मला वाचून दाखविण्यांत आले. त्यांचें वाचन चालू असतां, मला कंटाळा तर आला नाहींच-पण प्रत्येक पृष्ठापासून नूतन आनंद होत गेला. हें नाटक फार सुलभ असून सुरस आहे. आणि त्याची भाषाही चटकदार आहे. आणि त्यांतही विशेषः—**ऐतिहासिक कथानकांत** आणि **कालानुक्रमांत** होईल तितकें करून-फरक पडूं दिलेला कोठें दिसत नाहीं. ग्रंथकाराची **उर्दू** आणि दुसऱ्या कित्येक भाषांत चांगली गति आहे. नाटक पणं नाटक बनलें आहे!—वर्णनाची हतोटी किती तरी वर्णनीय आहे! मनोविकार तर प्रत्यक्ष पुढें उभे राहाताहेत!-आणि या सर्वांवर ताण करणाऱ्या **करुणेची** तर कमाल आहे! ह्मणूनच त्यांतील कित्येक प्रवेश **हृदयभेदक** बनले आहेत!

एकंदरींत हें **करुणरसात्मक नाटक** पाषाणहृदयांससुद्धां द्रव आणून रडवून सोडवील!!!

सारांश मी मोठ्या आनंदानें सर्व **महाराष्ट्रभाषानाट्यग्रंथरसिकांस** अशी शिफारस करितों कीं, त्यांनीं तें वाचावेंच. माझी तर खात्री आहे कीं, त्यांस-किंबहुना आबालवृद्धांसही तें पसंत पडेल. प्रस्तुत ग्रंथकारास अशाच कृति करण्याची उमेद येऊन, त्यांत त्यास यश येवो असें मी इच्छितों.

कोल्हापूर,<br>ता० ३० आगस्ट<br>सन १८९३.

(सही) **राजाराम खंडेराव वैद्य.**<br>सरसुभे, इलाखा कोल्हापूर,<br>करवीरराजसभासभासद (कौन्सिलर.)

---

"श्री० नारायणराव पेशवे यांचा वध" या नाटकांतील कांहीं वेंचे मला वाचून दाखविले. ते ऐकिल्यावरून, मी मोठ्या आनंदानें त्यांच्या या पुस्तकाच्या उत्कृष्ट गुणांबद्दल माझेंही अल्पसें

मत—त्यांच्याजवळ दुसऱ्यांचीं जीं अनेक उत्तम मतें आहेत—त्यांत सामील करतों. ........................................

मिस्तर रायसिंहराव यांचें उर्दू आणि हिंदी भाषांचें पूर्ण ज्ञान या विषयावरील माझी ग्रंथकारांस मागें हटविण्यास कारण झालें आहे. त्यांच्या महाराष्ट्रभाषापटुत्वाविषयीं बोलणें नकोच—जरी ती भाषा वस्तुतः त्यांस परकीय आहे—तरी त्यांच्या हुकुमतींत ती किती तरी आहे! नाटकाचें संविधानक उत्तम साधलें आहे. पात्ररचनाचातुर्याची खुबी खूबच उतरली आहे. आणि प्रत्येक पात्राच्या तोंडीं जे शब्द घातले आहेत—ते अगदीं तोलून! त्यांनीं हें नाटक रचतांना, जुने ऐतिहासिक लेख—बखरी—कागद—पत्र वगैरे चाळून पाहण्याचे पुष्कळ श्रम घेतल्याचें दिसून येतें—कांहीं कांहीं गोष्टी तर कित्येकांस नवीनशा दिसतील. हें पुस्तक **महाराष्ट्रनाट्यग्रंथमालिकेंतील** उत्कृष्ट ग्रंथांत गणलें जाण्यास पात्र आहे, असें ह्मणणें हें मि० रायसिंहराव यांचा गौरव करणें होय. व त्या गौरवास ते योग्य आहेत. असें त्यांच्या या कृतीवरून स्पष्ट दर्शित होताहे.

(सही) **वि. के. कीर्तिकर. बी. ए.**
डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर, कोल्हापूर.

कोल्हापूर,
ता० २० आगस्ट १९३.

---

मिस्तर रायसिंहराव नारायण यांनीं आपल्या **नारायणराव पेशवे** या नाटकांतील **उर्दू** भाषेंतील कांहीं वेंचे मला वाचून दाखविले. ते ऐकल्यावरून मी बहुत खुषीनें बेशक ह्मणतों कीं:—**उर्दूजबानवर** त्यांची **हुकूमत** तारीफ करण्यालायक आहे. ते त्या बोलींत आपल्या दिलांतील भाव व खुबी बयान करूं शकतात. त्यांची **इबारत** व्याकरणरीत्या दुरुस्त आहे, इतकेंच नव्हे—तर त्यांतील **मुहावरे** (अर्थात् भाषणसंप्रदाय) ही खूबीदार आहेत. आणि त्यांत कित्येक ठिकाणीं फारसी **बैता** आणि ह्मणी अशा कांहीं **मौकूयावर** (अर्थात् योग्य प्रसंगीं) घातल्या आहेत कीं तेणेंकरून त्या **इबारतीची रंगीनी**

आणि **मिठास** जियादः खुलून **इल्माची** (अर्थात् **साहित्याची**) **बारीकी** आणि **कारीगरी** खूब नजरेस येते.

याशिवाय त्यांचें दुसरें नाटक **शिवाजी** (जें अद्याप अपुरें आहे) यांतील कांहीं भाग खुद्द त्यांचे तोंडून ऐकण्याचा मौका मला मिळाला. तें ऐकल्यावरून तर मला असें ह्मणण्यास बिलकुल हरकत दिसत नाहीं कीं :-ऐशा **मुल्कांत**, कीं ज्यांत-**उर्दू फारसी** या भाषांचा प्रचार फार कमी असतां-असा बहुत भाषांत पुरा काबिल-**मुसन्निफ** (अर्थात् ग्रंथकार) निपजणें हें त्या **देशास अभिमानास कारण** होय.

मला विशेषेंकरून त्यांची नाटक पढण्याची तऱ्हा पाहून फार खुषी झाली!-खरोखरच ती पढण्याची खुबी बहुत बहुत **दिलपसंद** आहे. ती ऐकून ऐकणारास या **फारसी कहावतीची** याद होते:-

"तसन्निफ रा मुसन्निफ नेको कुनद बयान" अर्थात् (ग्रंथकारच ग्रंथाचें यथार्थ वर्णन करतो) मी मुद्दाम बहुत ध्यान देऊन-खूब दिल लावून-**औरंगजेब** आणि **दिलेरखाँची गुफ्तगू** अर्थात् बोलचाल ऐकली! व तेणें करून मला बहुत खुषी झाली. ............

सर्वांच्या मागून मि॰ रायसिंहराव यांनीं मला **पुरबिया** ऊर्फ "भैया" लोकांच्या नाइकांची आपसांतील बातचीत व आस्मानखानाशी त्यांचें भाषण हीं वाचून दाखविलीं. हीं त्या **अनपढ** लोकांच्या स्वाभाविक **गंवारी** अर्थात् अडाणी **हिन्दुस्थानी** बोलींत-अशा खुबीनें वर्णन केलीं आहेत, कीं तीं पात्रें **हुबहू** नजरेसमोर दिसतात! या प्रवेशांत **मजा** तर खराच-पण त्यांतले त्यांत बोध ही घेण्यासारखा आहे! येणेंकरून या नाटकाचा प्रयोग पाहून काय **अनजान**-काय **सुजान** सर्व सारखे खुश होतील.

शेवटीं मी हें इच्छितों कीं त्यांच्या या **इल्मांच्या** उद्योगांस खूब **बरकत** येवो.

**कोल्हापूर,**
ता॰ २ सप्टेंबर १९३.

(सही) **निजामुद्दीन अहमद. बी.ए.,**
न्यायशास्त्राचे व्याख्याते आणि **फार्सीचे** प्रोफेसर ऊर्फ वस्ताद-राजाराम कालेज, कोल्हापूर.

# नाटकांतील पात्रें.

## पुरुषपात्रें.

नारायणराव साहेब— पेशवा—नायक.
राघोबादादा साहेब— त्याचा चुलता—उपनायक.
नानाफडनवीस— मुख्य मंत्री.
सखाराम बापू— कारभारी.
रामशास्त्री— मुख्य न्यायाधीश.
सुमेरसिंह जमादार— गारद्यांवरील मुख्य सरदार.
आस्मानखान— त्याचा दोस्त शागिर्द—नाईक.
नरसिंह, गुरुदत्त, खड्गबहादुर, रणमल्ल — गारद्यांचे नाईक.
चांपाजी टिळेकर, तुळाजी पवार —हुजऱ्यांचे नाईक.

## स्त्रीपात्रें.

गंगाबाई— नारायणराव पेशव्याची स्त्री—ना.
आनंदीबाई— राघोबादादाची स्त्री—उपनायिका.
गजी— तिची दासी.
पहारेकरी,—नाईक, गारदी, दासी वगैरे.

॥ श्रीजगदंबा प्रसन्न ॥

# श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध

## अथवा

# आनंदीबाईचें अजब कारस्थान नाटक.

## अंक पहिला.

### नांदी.

पद. ( राग चर्चरी. )

आहा नटनायकविभु—किती नटतसे ॥ ध्रु० ॥
कोठें करि राजवेष,—कोठें जति भिक्षुभेश ॥
जटायुक्त मुक्तकेश, देश फिरतसे ॥ १ ॥
कोठें करि सुखद लग्न, कोठें विरहाग्निमग्न ॥
रुग्णस्थिति कायभग्न, कण्हत पडतसे ॥ २ ॥
बनुनि शहनशाहमस्त, जिंकुनि पृथिवी समस्त ॥
करूनि सकल नृप शिकस्त, राज्य करितसे ॥ ३ ॥
ऐशा हो विविधरूपिं, ओळखि जो चित्स्वरूपि ॥
त्याप्रति तो बहुरूपि, उद्धरीतसे ॥ ४ ॥ आहा०

**सूत्रधार**—पुरे पुरे ! नाटकारंभीं जगन्नायकाची प्रेमपूर्वक अल्प स्तुतिही पुरे !

(परिपार्श्वक जातात, आणि विचित्र वेशानें नाचत नाचत विदूषक प्रवेश करतो. त्याजकडे पाहून) कोण ही विचित्र मूर्ति ?

**विदूषक**–तो बहुरूपी !

**सूत्र०**–तो बहुरूपी ह्मणजे ? नांव काय तुझें ?

**विदू०**–नटनायक !

**सूत्र०**–नटनायक ? येथें कां आलास ?

**विदू०**–स्मरण केलेंस ह्मणून ! "आ आ **नटनायक-विभु**" ह्मणून नाहीं का ह्मटलेंस ?

**सूत्र०**–तर तूं का **नटनायकविभु** आहेस ?

**विदू०**–यांत काय संशय ? तोच मी स्वयंभू !

**सूत्र०**–धृष्टा ! **नटनायकविभु** तूं ?

**विदू०**–होय–होय ! ह्मटलें ना तोच मी–आणि मी तोच ह्मणून ! ज्या अर्थी–**नटनायकविभु**–सर्व घटांत भरला आहे–त्या अर्थीं तो माझ्यांतही आहेच. तर मीं विभु ह्मणविल्यास धृष्टता ती काय केलीरे बुवा ?

**सूत्र०**–तर तुह्मी मोठे वेदांती दिसतां ! पण हे कीट-कोटिकीटका! त्या **अनंतकोटिब्रह्मांडनायका**ची बरोबरी तूं **भांड** का करूं शकणार? हें तुझें अकांडतांडव पुरे कर, आणि तूं कुठला ? कोण ? आलास कां ? हें स्पष्ट सांग–नाहींतर—

**विदू०**–"नाहींतर"? का रुष्ट होणार तुह्मी ?

**सूत्र०**–छे छे! शिष्टांवर का रुष्ट व्हायचें ? अहो, तुह्माला

येथें यथेष्ट मुष्टिमोदक देऊन तुष्ट करून लावायचें, समजलांत ?

**विदू०**–(मिशांवर ताव देऊन) अरे, या वज्रमुष्टीस मुष्टिमोदकांनीं तुष्ट करणारा या सृष्टींत तर नाहींच कोणी ! हा नटांचा राणा विदूषक–**श्रीमन्नारायणराव**साहेब पेशवे यांच्या मृत्यूचा फार्स होणार हें ऐकून–त्यांत पार्ट घेण्याकरितां या रंगभूमीवर विराजमान झाला आहे !

**सूत्र०**–तर अशा दूषकांच्या राण्याचें–**विदूषकाचें**–मृत्यूचा फार्स करणाऱ्याचें–आमच्या नाटकांत काम नाहीं ह्मटलें ! चलावें.

**विदू०**–काय, ह्मणतां काय ? **नारायणराव** पेशवे यांच्या मृत्यूच्या फार्सांत आमचें काम नाहीं, तर गृहस्था, तुझें तरी कायरे काम इथें ?

**सूत्र०**–कोण कसली ब्याद ही ! अरे, मी तर या नाटकाचा नियामक–ह्मणजे **सूत्रधार** !

**विदू०**–आणि मीही पण **रंगभूमीचा नायक**–**फार्साचा मुख्याधार** ! पण त्या संगीत रंगी नायकिणीच्या नायक नव्हे बरें ! !

**सूत्र०**–पण इथें फार्स नाहीं–**नारायणराव** पेशवे यांच्या मृत्यूचें शोकपर्यवसायी नाटक आहे !

**विदू०**–तर त्यालाच फार्स ह्मणत असतों आह्मी–अर्थ एकच !

**सूत्र०**–तर चलावें, निघावें तुह्मीं! मूर्खशिरोमणि शो-
कास हर्ष ह्मणणारे!

**विदू०**–अरे गृहस्था! तुझ्यांत सौजन्याचा गंध तरी
आहे काय? 'चलावें' 'निघावें' ह्मणजे काय? सर्वांसच
चलायचें निघायचें आहे! "फलेंगे सो झडेंगे–चढेंगे सो प-
पडेंगे" हा या मृत्युलोकचा सिद्धांतच आहे! पाहिलें-
सना–**संगीत–कफन्या** का कंपन्यांनीं दोन दिवस कशी
बहार मारली! पण अखेर–तेरड्याचा रंग तीन दिवस–
तशी गत झाली! **संगीतास** ऊत येतांच एक **संगीत**
**हज्जाम** उत्पन्न झाला! आणि त्यानें रंगांत येऊन त्या
**संगीत नटनायकिणीं**ची चट **संगीत हजामत** क-
रून ऐसा **हजम्मा** दिला उडवून कीं बघत रहावें.
पण आमच्या कमनशीबानें ह्मणा–कीं दुनयेच्या रहा-
टगाडगी न्यायानें ह्मणा–एका भुताटक्यास ऊत येऊन–
त्यानें आमचे **राक्षस** पार्टीस मागें हटवून, आपलें **हमलठ्ठ**
**भूत** रंगभूमीवर नाचवायाचा सपाटा चालविला आहे!
पण धन्य त्या अंबटशोकी लोकांच्या खट्ट्या शोकाची!
तसल्याही पांचट वात्रट नाटकाला–त्या हाडांच्या सांप-
ळ्याला पहायाला कोण गर्दी! असो. वर्षांचे दिवस तीन-
शेंसाठ–त्या **हमलठ्ठ** भुतालाही कुणी तरी **लठ्ठभारती**
**पंचाक्षरी** भेटेलच भेटेल!

**सूत्र०**–तर भले विघ्नसंतोषी दिसतां तुह्मी?

**विदू०**—अहो, उघडच आहे—आमच्या **आदिनाटकास 'कंट्री नाटक'** ह्मणून बुडवूं पहाणारांस आह्मीही पाण्यांत पहाणारच. अहो, खरें ह्मटलें असतां—आह्मी आपले गरीब गडी—आपला आचारी पाणकेपणा सोडून नाटकी धंद्यांत पडलों—आणि **विष्णुदासाच्या** नांवावर यथेच्छ मजा मारीत होतों—पण आतांच्या नटांसारखे बरांडी झोकीत नव्हतों हो—तें विघ्नसंतोष्यांस न बघवून त्यांनीं संगीत कफन्या घातल्या— भुकीश नाटकें रंगभूमीवर आणलीं—त्या रांडापोऱ्यांनीं पोटावर पाय दिला आमच्या ! अहो, पण तीं का नाटकें ह्मणायचीं ? नाटकाची थट्टा ती ! ज्यांत **वक्रतुंड गजानन महाराजांचें आगमन** नाहीं—ज्यांत **निष्पादमयूरारूढ** ब्रह्मकुमारीचें "धृंकिट धृंकिट" **नृत्य नाहीं**—ज्यांत असादिकांसारख्या **पुरातन नटराज विदूषकांच्या नकलाही** नाहींत—त्यांत मग रस तो कसला असणार ? सर्व नीरस फिकें ! सारा मूर्खांचा बाजार !

**सूत्र०**—शाबास पुरातन नटराज ! असल्या वक्रोक्ति गर्वोक्तीचे भोक्ते हल्लीं क्वचितच असतील ! पण तुह्मी भुकीश भुकीश तरी कुणाला ह्मणतांहो ?

**विदू०**—बुकावरून पाठ करणाऱ्या घोक्यांस !

**सूत्र०**—तर तुमच्या आदिनाटकांत **बुकांची जरूर** नाहींच का ?

**विदू०**—बुकाची तर नाहींच नाहीं—पण घोकायची देखील नाहीं. समयास सुचेल तें द्यायचें ठोकून! घोकून कुठें **रस** होत असतो—**रसोपत्तीस** अंगचे वक्ते लागतात ह्मटलें, असले!

**सूत्र०**—तर अहो अंगचे वक्ते! ही रंगभूमि आपल्या बेबंद बकण्यास कंटाळली आहे, तर कृपा करून या रंगीबेरंगी लकतरांसहित आपली स्वारी बाहेर पडली पाहिजे—ह्मणजे श्रोतेमंडळीवर उपकार होतील! आहे ना आमच्यांत सौजन्य?

**विदू०**—काय ह्मणतां? इतका का वीट आला आहे आमच्या खेळाचा? तर अशा आमच्या खेळाचा खेळ करणाऱ्या खेळ्यास—खळग्यांत घालून—आह्मी आपले **आनंदीकाकूच्या** मेळ्यांत जाऊन मिळणार!—(त्याला धरायाला जातो—तो मागें मागें सरतो.)

**सूत्र०**—(हंसून) भला धूर्त दिसतोस बुवा! तूं आपला स्वच्छंदपणा सोडून—आह्मी सांगूं तसें वागशील, आणि बोलूं तें पाठ करशील तर तूं आपला पार्ट उत्तम करशील यांत संशय नाहीं.

**विदू०**—तर आमचाही असाच पाठ आहे, कीं—वारा वाहील तशी पाठ करायची! "पानी तेरा रंग कैसा? जिस्में मिला वैसा."

**सूत्र०**—तर विदूषकाचा पार्ट सोडून, जो तुला साधेल तो कर.

**विदू०**—अहो आह्मां स्वतःसिद्धांस असाध्य तें काय? पण त्यांतले त्यांत—आमचा आवडीचा पार्ट—ह्मटला ह्मणजे—**गजाऊचा!**

**सूत्र०**—काय! गजाऊचा पार्ट तूं करणार? या उतारवयांत तो कसा शोभणार? या बड्या मिशांची काय वाट लावणार?

**विदू०**—वयाची, मिशांची आणि गजाऊचे पार्टाची काय हो संगत? काळी चंद्रकळा आणवा आणि पहा चमत्कार! (एकजण ती आणून देतो—ती घेऊन तो आपल्या अंगाभोवतीं गुंडाळतो.) कां, कशी आहे मजा? आतां ह्या गजाऊचें नख तरी दिसतंय का! मग उतार वय—अन् बड्या मिशा दिसणार कशा? आहो ही गजाऊ किनई—पडली मराठमोळ्यांतली भारदस्त बायको—उघड्यामाथ्यानें का कुणापुढें येणार? मग बघा ही गजाऊ, अशीच जाऊन त्या पुरभय्याचा कंपू गांठणार—अन् अशी गर्जू लागणारः—"ॲरॲ—ॲ—सांबरशिंग जमाद्दाड! ॲरॅ—ॲ—ॲ मुर्दाडशिंग जमाद्दाड! ॲरॅ—ॲ—ॲ शेंबूडशिंग जमाद्दाड! ॲर मेल्या, बोलनास काय म्हून रॅ? माजलास व्हई?" ऐशी गर्जना ऐकतांच ते जातीचे पुरभय्ये पण भयानें—भयभीत होऊन—"कौन **भस्मावंती** पुकारतीहै बे"! ह्मणून पहायाला येणार—पण तिथ्थें काय दिसणार? केवळ काळ्या चंद्रकळेची पुतळी! **शीळवंती नार**! घुंघटके पटमें सब गट करनेवाली **गजाऊ**!

**सूत्र०**—शाबास ग **गजाऊ!** **आनंदी**बाईची कामगिरी पुरी बजावलीस तूं! पण—हा पार्ट झाला आनंदीच्या गूढ मसलतीचा फार्स—अर्थात् फजिता!

**विदू०**—राहिला हा फार्स! (चंद्रकळा सोडून फेंकून देतो.) सुमेरशिंगाचा पार्ट देऊं उडवून?

**सूत्र०**—फार्स उडविणार का पार्ट करणार?

**विदू०**—अहो पार्ट ह्मटलें ना? त्यांत तर आमचा हातखंडा! जेव्हां का आह्मी सुमेरशिंग बनून— गुलाबशिंग, खडकशिंग वगैरे शिंगांचे शिंगे बरोबर घेऊन, नंग्या समशेरी चमकावीत शनवारचा वाडा घेरतों—त्या वेळचा '**सीन**' काय **शान!** बोलो '**दीन**' ह्मणतांच—आमचे **बडे शिपाईके पूत** रजपूत—'**दीन दीन**' करीत जे पुढें दिसतील त्यांचा सफ्फा उडवीत—ऐसी बहादुरी करून दाखवितात—कीं **गोब्राह्मणां**ची देखील कत्तल!

**सूत्र०**—शिव शिव! **गोब्राह्मणां**ची देखील कत्तल? तीही '**दीन दीन**' करीत तुह्मी हिन्दु करतां? तर तुह्मी '**दीनके दीवाने**' **अविंधांचे बंधू** अडनांवाचे **हिंदु** ह्मणायचे!

**विदू०**—अहो पण त्या हातघाईचे प्रसंगीं **हिन्दूबन्धू** "**दीन दुनया**"—यांजकडे पाहतो कोण! "**खून** के प्यासे हम **खूनीमर्द**!"

**सूत्र०**—वाःरे मर्द! तर तुह्मी "**मौत**के **भाई**" ह्म-

णायचे. "नाहीं नाहीं" ह्मणतां ह्मणतां आपल्या **आदिनाट**-**कांचा** भला दिला उडवून **फार्स**—ऊर्फ फजिता **तुह्मीं** बुवा!

**विदू०**—पण, यांत बिघडलें तें काय बुवा? आह्मीं आपल्या जगजाहीर फार्साचा नमुना दाखविला त्याचेही शोकी लोक आहेत, त्यांचा शोक पुरविला! **तुह्मीही** आपलें—जगाबाहेरचें अर्थात् नवीन नाटक दाखवा जगाला! ह्मणजे ही **दुनया दुरंगी**—हा गंगाजमनी खेळ पाहून—दुप्पट खुष होईल! आतां कृपा करून एवढें सांगा, कीं—हें नाटक रचलें कोणीं? आणि त्याचे कथानकास आरंभ कुठून झाला? वगैरे—

**सूत्र०**—तर ऐक—थोडक्यांत सांगतों:—ज्या अनेक भाषाप्रवीण नाट्यकलानिपुण **कविसिंहानें** दोन तपें खपून—जीं अनेक नाटकें रचलीं आहेत—व जीं अनेक विद्वान श्रीमानजनमान्य झालीं आहेत—त्या **राजसिंहदेवकृत सुकृतीं**पैकींच—**"नारायणरावपेशवे यांचा वध** अथवा **आनंदीबाईचें अजब कारस्थान"** हें नाटक आह्मी **श्रीमान् श्री १०८ महाराष्ट्रराजकुलकमलदिवाकर शाहूछत्रपतिमहाराज** यांच्या **तोषार्थ** करणार आहों.

**विदू०**—तर फारच उत्तम! अशा उत्तमोत्तम प्रसंगीं-तुह्मीही आपली उत्तम तयारी केली असेलच!

**सूत्र०**—यथाशक्ति यथामति आह्मीं केली आहे—पण

रसिक सज्जनांनीं तद्दोषांकडे न पाहतां–गुणलेशाकडे दृष्टि दिली तर त्यांचाही संतोष होईल अशी आशा आहे.

**विदू०**–समजलें ! पण नाटकास आरंभ झाला कुठून हें अजून कळलें नाहीं—

**सूत्र०**–तर ऐक–श्रीमंत **नारायणरावसाहेब** पेशवे हे आपल्या मातुश्रीला भेटायला नाशकास गेले असतांना, आनंदीबाईनें औरंगाबादच्या सुभ्याशीं संधान लावून–त्या-जकडून परभारें **नारायणरावसाहेबांस** ठार मारविण्याची बेमालूम मसलत केली,–पण ती,–त्या विवशीच्या कमूबख्-तीनें नानाफडनविसास कळली–ती कळतांच त्यांनीं कांहीं निवडकस्वार पाठवून **रावसाहेबांस** तेथून काढून पुण्यास आणविलें, व त्या राक्षसीस तिच्या पतीसहित तिला नक-ळत नजरबंद करून ठेवलें, हें तिच्या लक्षांत येतांच ती कशी खवळली आहे, येथून या नाटकास आरंभ– ( पडद्यांतून आनंदीचे –"आहारे पढतमूर्खांनो !" हे शब्द ऐकून–दचकल्या-सारखें करून ) आलीरे आली पेशवाईची साडेसाती इकडेसच आली ! चल–पळ ! ( जातात. )

**ही प्रस्तावना झाली.**

( नंतर संतप्त झालेली **आनंदीबाई** प्रवेश करिते. )

**आनंदी०**–( रागांत आपल्याशीं ) आहारे पढतमूर्खांनो ! हाच का तो–तुमचा नांवाजलेला **चाणाक्षपणा** ? याच गुणांवरून का तुमची गणना **साडेतीन शहाण्यांत** ?

(हात उचलून) अरे क्रियानष्टांनो! ज्या **समशेरबहाद्दरानें**—आपल्या **समशेरीच्या** धारेनें—ही **पेशवाई गाजविली** आणि **पाच्छाई लाजविली**—त्या **महावीरा**वर तुह्मां **भागूबायांची** इतकी करडी नजर कीं त्याला नजरबंदी? त्याजवर चोरपाळत? अरे चोरांनो! हरामखोरांनो! कचेरींत बसून खर्डे घासल्यानें—अगर दरबारांत घुसून बाता छाटल्यानें—कांहीं राज्य कमावलें किंवा राखलें जात नाहीं. तर—आपल्या जिवावर उदार होऊन, हजारों वीरांवर तुटून पडून, त्यांचा पुरा पराभव करून, विजयश्री वरून, राजलक्ष्मी धरून स्थिर करावी लागते—तेव्हां ह्मटलें—**हें राजवैभव प्राप्त होत असतें!** (दांतओंठ खात खात) काय करूं रे! माझा **महामंत्र** अद्याप सिद्ध झाला नाहीं. नाहींतर तुमचा **मंत्रीपणा**—तुमचा **मुत्सद्दीपणा**—तुमचा **कारभारीपणा**—मातींत दडपण्यास उशीर काय! तरी **चिंता काय**? अरे! **या महामायेच्या महाजालांत**—तुह्मी मंदमति—अडनांवाचें मंत्री—कधींनाकधीं तरी सांपडालच सांपडाल! (गंभीर मुद्रेनें) असो—पण माझी **गजी** अजून कां येत नाहीं? खरीखुरी **स्वामीभक्ति**—आजकाल या मेल्या पापी **पुण्यां**त—तिच्यांतच वसत आहे! (गजीस येतांना पाहून हंसत) आली—आली आमची **सई**! आली एकदांची.

उदंड आयुष्य आहे माझ्या गजाऊला—नांव काढतांच आपली दत्त—उभी!

**गजी**—माझँ बाई—समदँ आऊख जाऊ—माझ्या बाईसाबाला. (हंसते.)

**आनं०**—कशालाग बाई तें? बंदींत पडून सडसडून मरायला का? पण—कांग गजे! आज तूं भारीच खुशींत दिसतेस ग! ती मेली नजरबंदी उठली कीं काय?

**गजी**—(धिक्कारपूर्वक हात झाडून) अजी है काय त्यांत राम? आखर ती मेली नजरबंदीच ना?

**आनं०**—होय ग—पण ती कांहीं गारुडी नजरबंदी नव्हे. त्या पाजी **नानाचा** कर्णपिशाच—तो **रुपाजी शिंदा**-आपल्या साग्यां लाग्यांसुद्धां बसला आहे ना आमच्या पाळतीवर?

**गजी**—(डौलानें) व्हयजी—तें समदँ खरँ—पन्—त्या कानपिस्या नानाच्या—त्या पिसाटाला—या आपल्या बहादुर बटकुरानँ—पिस्सँ लावून अक्षी आपल्या बस्सांत कीं जी आनूनशनी सोडलया!

**आनं०**—(चकित होऊन) काय ह्मणतेस? तो—तो **नानाच्या** नाकचा बाल—तुझ्या नादीं—इतपत कसा ग लागेल?

**गजी**—(मोठ्या ऐटीनें) कां न लागॅल जी? आपून काही गजी हलकी समजला व्हय? (हात हालवीत) अजी या

बहुरुपनीनँ—आपल्या या मारु रूपानँ—त्या रुपाजी सारखॅ पाजी—कैक टाकल्याती भुलवून—झुलवून ह्मतलँ ! अत्तां त्यो सिंदा माझा मिंदा—अन या पायाचा ( आनंदी-बाईच्या पायास हात लावून ) बंदा बनलाया ! आजपून आपून म्हून—निचींत—सवस्त—बेफिक्कीरॅ अस्सावॅ ! त्यो अत्ता बघा—नानांच्या नानाला सुद्दा बदायचा न्हाई ! इकडची खबर बात—म्हून—नानाच्या कानांवर घालायचा न्हाईच ! ! तिकडली बरीक बित्तम बातमी इकड कळीवल्या बिगर न्हायाचा न्हाईच न्हाई ! ! !

**आनं०**—( सहर्ष ) अहाहा ! खरेंच का ग—तो पाजीचा पाजी त्वां—इतका राजी केला ? ( हंसते. )

**गजी**—तर का ही दासी—या पायापस्सी—खोट्टॅ बोलॅल ?

**आनं०**—तर बाई धन्य ह्मणायची तुझ्या रूपाची ! पण गजे, तुझें तें 'मारू रूप' या डोळ्यांना कसें दिसत नाहीं ग ? ( हंसते. )

**गजी**—( मोठ्या नखऱ्यानें ) अजी—न्हाईच दिसायचॅ जी बाईसाब,—बायकांच्या डोळ्यांनीं माझें तें **अनूप रूप** ! त्याला बघायला किनई **रंगेल** पुरसांचेच डोळॅ पाहिजेत बघा ! ह्मन है ना:—

"एक नूर रूपडा—दस नूर कपडा
"सौ नूर गहना—हजार नूर **नखरा** !"

या योक नूर रुपड्यास खुलिवन्यास—ह्यो माझा—दसनूर कपडा ! अन्—त्याजवरही ह्यो सौनूर सिनगार ! अन् या समद्यांचे वर त्यो हजारनूर नखरा ! तर त्या नखरेबाजींत ही आपली गजी झंजी पुरी तरबीज ! तर मंग, अस्सी नखरेदार नार—कुन्नास या नक्खा बोट्टावर न्हाई खेळिवनार ? ( मुरका मारून. ) अजी कैक बिरमचारी बी लाळ घोटीत—लागत्यात पाठीस, या खिल्लाड्ड गजीच्या !

आनं०—( आपल्याशीं ) किती निंद्य कृति ही ! पण इला ती स्तुत्य वाटते ! बोलून चालून दासीच ही ! पण आह्मांला ही अशा वेळीं अशीच हवी आहे ! इच्या हातून जें होऊं शकेल, तें मोठमोठ्या मुत्सद्यांकडून—लक्षावधि रुपये खर्चूनही होणें नाहीं,—कारण ही सर्व रंगाढंगांत पुरी पटाईत असून कोणत्याही कामीं मोठी दक्ष. तर—चढवावी इला हरभऱ्याचे झाडावर;—आणि पहावें इच्या हातून काय काय होतें तें. ( हंसत उघड. ) वाहवा ! अशी नखरेदार नार !—केवळ कामदेवाची कटार !—साक्षात् शक्तीचा अवतार ! मजजवळ असून—मला अभागिनीला कशी दिसली नव्हती बाई आजवर ! तर बाई शक्ति ! तुला मी ब्रह्मचाऱ्यावर घालीत नाहीं—एका घरबाऱ्यावर सोडतें—तर जा, त्या सखारामबापूला भुलवून, आपला 'बंदा' करून आण कशी !

ह्मणजे वध,–निम्में काम झालें.–तो **सगळा शहाणा** आपल्या कटांत आला,–कीं त्या **अर्धशहाण्या नानाला** घातलाच पालथा ह्मणून समज !

**गजी**–समजलें ! पन मी ह्मन्तें त्यो मेला **काळुंद्रा**–लफंगा–पुरा शिट्टाऊ–कशाला जी आपल्या कट्टांत ? त्या **लाममान्याच्याच** माळेंतला त्यो–अट्टल सोदा. सद्दा न कद्दा मेल्याचे दुथडीवर हात–दुटप्पी भाशेन ! बाईसाब, आपनांस राग न येईल तर बोलत्यें–बोलूंच का ?

**आनं०**–बेलाशक बोल !

**गजी**–पन ह्मनाल लहान तोंडीं मोट्टा घास !–तरी बोलत्येंच अत्ता ! मी ह्मनत्यें–त्या दोडांला–जुन्या खोडांला अनकूळ करून घेन्यापक्षीं–समूळ खन्नून काढलॅलँ कस्सँ ?

**आनं०**–( आनंदानें ) वाहवा ! काय लाखी मसलत ही ! धन्य तुझ्या अकलेची ! तूं दासी असून–तुला जें कळताहे–तें आमच्या खाशा रणशूरांचे स्वप्नींही येत नाहीं. आजपर्यंत त्या काळुंद्र्याच्या संगतीनें आमचे **नंदीपति** सर्वस्व घालवून **बंदीवान** होऊन बसले आहेत, तरी त्या लफंग्याचा नाद सोडीत नाहींत ! गोडबोल्या मेला–गोडगोड बोलून–इकडचें सारें काढून घेऊन, तिकडे जाऊन आमच्या साऱ्या मसलती हाणून पाडतो ! आणि इट[illegible] [illegible]नवघड ही करून आपण आपला नामानिराळा–इकडच्य[illegible] [illegible] अष्ठसिद्धी–मर्जींतला ! काय करूं ग इलाज चालत नाहीं–[illegible] [illegible]नत्यात ना "बाप ना तशी गत–" आपला दाम [illegible] [illegible]रा[illegible] पुऱ्या गतात ना" !

**गज्जी**—बाईसाब, माफ करावॅ—बोलल्याबिगर राहवॅना ह्मणून बोलत्येच—आमच्या **धनीसाबांच्या** अंगी—इकतॅ शानपन असतॅ—तर आपून होऊनशानि काय म्हून **नारायनास** गादी दिल्ली असती ? अन् अस्सॅ डोईजड कारबारी कश्शापाई ठिवलॅ असतॅ ? घ्या ह्मन्नावॅ—आत्तां तें पोर झालॅ समद्यांहून थोर! अन् ते चोर—**नान्या—माम्या—बाप्या—तात्या—फडकॅ, धुडकॅ** झालॅ कारबारी! अन् **धनीसाब** राहिलॅ अंदी ना मंदी—धक्कॅ बुक्कॅ खात—वडवागळीगत—उलटॅ लोंबकळत !

**आनं०**—( उसासा टाकून ) खरेंच बाई—अशीच आमची दशा झाली आहे खरी ! काय हा ईश्वरी न्याय तरी !

**गज्जी**—अजी, त्या अंधळ्या ईश्वराच्या घरीं—ओलॅ वाळलॅ चट सारॅ जळतया:—"पतिबरता भूखी मरे—पेडे खाय छिनाल" !

**आनं०**—खरेंच बाई—या कलीचें माहात्म्यच तसें! पण आत्तां आह्मीं करावें कसें ? त्या "लांबमान्या"च्या दूरदृष्टी पुढें आमचें सारें कृत्य उघडकीस येतें !

**गज्जी**—( आवेशानें ) तर त्या लाममान्याची लाम मान [illegible]वी कश्शापाई ?—टाकावी छाटून ! अन् त्या का-[illegible] [illegible]ची काटावी गर्दन ! अन् त्या फडक्याचॅ उडवावॅ [illegible] राहिल्या साहिल्या वैन्यांच्या सुडक्यांला टा-[illegible], [illegible] [illegible]य—तें **नारायन** पोर अन्नावॅ कावॅ

ठिक कुंद धुडकेवून

ढोरावानी वळवून–अन् ठिवाव कोंडून! बसलॅ तिथ्थॅ गुप्पचुप्प तर बरॅ–न्हाईतर करावॅ कुन्यातरी कसाबाच्या सवाधीन झालॅ–आटपलॅ रामायन! मंग काय–येकछत्री होऊन–निर्भयपनानॅ–करावॅ पिर्थमीचॅ राज! मंग पेसवॅ तरी काय म्हून म्हनवावॅ? छत्तरपत्ती म्हाराज बनून तक्तावर बस्सावॅ–मोरचलॅ उडवून घेत!!!

**आनं०**–(आश्चर्यानें) आहाहाहा! छत्रपतिमहाराज बनणार आह्मी–फुटक्या कपाळाचे पेशवाई देखील घालविणारे! आमची–पेशवाईच आह्मांला मिळूंदे परती–ह्मणजे आह्मी सर्व कांहीं मिळविलें ह्मणूं!

**गजी**–ते बी बेस! पेसवॅ झाल्यावर राहिलॅ काय मंग? अजी पेसवॅच तर–आजकाल म्हाराजांचॅ म्हाराज हैत-कीं ज्यांच्या राज्याचा झेंडा–अटके पावतर फडकतोया! फकत–तकतावर बसून–छत्तरपत्ती म्हनवायचीच काय ती बाकी! तर तेवढॅ घडून यायला ती येकूच नड ना? ते डोईजड कारबारी! तर म्हंते त्यांच्या जड डोया ठिव्वा कश्शापाई?

**आनं०**–अग तेंच तर अवघड!

**गजी**–अजी बाईसाब! पैक्याचे मारापुढॅ अवघड तें काय? त्या एक्या लक्षुमीच्या घरीं, त्या अष्ठसिद्धी–नऊनिध्धी–पानी भरत्यात म्हतलॅ पानी! म्हनत्यात ना "बाप

बडा न भैया–सबसे बडा रुपैया" ! त्या रुपैयाचेपाई बाई भाईबंदाचॅ–आईबापाचॅ बी **खून** पडत्यात ह्मतलॅ **खून** !

**आनं०**–अगे–त्या कामीं–थोडा का मीं पैका खर्च केला?

**गजी**–( हात झाडून ) अजी अश्शा धा ईस–पाच पंचीस तोड्यांनीं का तीं जुनीं खोडॅ तोडलीं जात्यात ? त्यांजवर किनई–लाखांचा मार केला पाहिजेल ह्मतलॅ लाख्खांचा !

**आनं०**–अग, आज काल त्या **करजत्काळांच्या सद्दी**च्या जोरापुढें–प्रत्यक्ष **काळ**ही चळचळ कांपतो आहे–तिथ्थें–तुझ्या लाखांची डाळ काय गळणार ?

**गजी**–तर ते मेले का अमर झाले ? बाईसाब ! इचवाला पाल **काळ** ! सापाला मुंगूस **काळ** ! तस्सॅच त्या **कर्जत्काळां**सबी कुन्नी तरी उलथ्या काळजाचा **काळ**–या पिर्थमीच्या पाठीवर कुठ्ठंतरी अस्सलच अस्सल ! दुरॅ कशाला–पैका खर्चल्यावर या–या–**पुन्यामंदीं** बी गावल ह्मतलॅ !

**आनं०**–काय ह्मणतेस–त्या **चांडाळ चौकडीस**–आणि **काळ** ! तोही या पुण्यांत ? असलें कुठलें ग बाई आमचें **पुण्य** !

**गजी**–अजी पण दाऊन दिल्ला–तर आपुन काय द्याल मल्ला ?

**आनं०**–जें मागशील तेंच देईन ह्मटलें !

**गजी**–तर ऐकावॅ—जे **मरनाला** बी न **डरनारॅ**

तेच बघा त्या **चांडाळाचॅं काळ** ! तर असले **निडरं**-काय ते **पुरभय्येच**. त्या पुरभय्यांमंदी बी—माईचॅं पूत—वचनाचॅं मजबूत, जातीचॅं **रजपूतच** ! बोलाचॅं खरॅं मोल तेच लोक जानत्यात ! सिवाय ते कस्सॅ **रनसूर** हैत-तें जगाला ह्मासूर हैच ! जसा बुदबळांतला प्यादा पुढॅ सरल्यावर-मागॅ म्हून न्हाईच घेत ! तसेच ते लडवय्ये भय्ये-कोनत्या बी कामी—ह्मोरॅ पाउल ठिवल्यावर मागॅ म्हून न्हाईच हटत !

**आनं०**—रजपूत रणशूर असतात हें तर खरेंच—पण तसेच ते भांगेंत चूर असतात ! तर तशा चंगीभंगी लोकांवर—अस्सें—जडजोखमीचें काम कसें सोपवावें ग ?

**गज़ी**—समदेच कांहीं 'भांगेत चूर' नसत्यात. त्या रनसूरांची बडाई करावी तिकती थोडीच ! त्यांच्या खुस-मौजेंतल्या गान्यांत बी सारी इरीसिरीच बघा ! न्हाईतर आमच्या दखनी कोकनी—राजॅसिरींच्या मुखसिरीमंदी सुंदर नारच चमकायची ! म्या त्या भैय्या लोकांच्या गान्यां-तले दोन बोल घट्ट करून ठिवल्यात. आपून ऐकाल तर अक्षी थक्क होऊन जाल—ह्यंत्ते ऐकावॅ:—( म्हणते. )

"जीवे बीस बरस कूकरिया-जीवे कागा बरस हजार !
"क्षत्री जीवे बरस अठारा-आगे जिवे ताहि धिक्कार"

**आनं०**—याचा अर्थ ?

**गज़ी**—याचा अरुथ अस्सा:—ईस वरसॅ कुतरडॅ बी

जगतया—हजार वरसें कावळा बी जगतोया—पन **खेतरी** बच्चानें अठरा वर्सां पावतरच जगावॅ-त्या पुढॅ जगल त्याला ह्मनॅ **धिक्कार**! मंजी अठरा वरसाचे आंतच-पराकरम करून **इंदरलोक** गाठील त्यो खरा सुराचा पूत—**रजपूत**!

**आनं०**—( साश्चर्य ) ओहोहो! काय अलौकिक शूर हे! मरणाची ह्मणून भीति ज्यांच्या स्वप्नींही वसत नाहीं—ते लोक मनावर घेतील तर काय न करतील बाई! तर बाई गजाऊ, कसेंही करून कोणा रजपुतांच्या सच्या शूर सर्दाराला गांठ कशी लवकर. तुझें **'अनूप रूप'** तुझा **'हजारनूर नखरा'** तुझें **'अजब कसब'** हीं सारीं मज-करतां खर्चीं घाल—व तुला त्या कामीं खर्चायला जितका 'पैका' लागेल तितका मजकडून बेलाशक घेऊन जा. मग तर झालें ना?

**गजी**—( सहर्ष ) मंग जी काय व्हावॅ! झालच काम फत्ते समजावॅ.

**आनं०**—तर जा कशी लवकर—पण जें करणें तें फार फार विचार करून कर बरें. नाहींतर बघ, मसलत फुटेल— मसलत फुटली कीं आमच्या आयुष्याची दोरीही तुटलीच समज!

**गजी**—अजी त्याइसी नको फिकीर. या पायापस्सी सिकूनसवरून पट्टाईत झालेल्या या गज्जीची—अन् मसलत फुट्टॅल? अजी कुठली फुटली बिटली असॅल ती बी जुट्टॅल!

अजी बाईसाब ! ज्याला म्हून मसलतींत घ्यायचा—त्याला अंदीच चाचाचपून—चाचाचपून पाह्याचा ! बसांत येन्याजोगा दिसल्यास—त्याला वाईच बोटचेपा करून ठिवायचा. मंग ऐन येळीं—मटकन् त्याच्या मनगटास धरून—हटकून काम करून घ्यायचँ त्याचेकून चटकन. ! ह्यो मंजी या गजीचा सादलेला मंतर !

**आनं०**—( हंसून ) शाब्बास बहाद्दर ! जा पळ तर ! काम फत्ते कर !

**गजी**—जालॅच ह्मना फत्ते. येते तर. ( हंसत हंसत जाते. )

( पडदा पडतो. )

---

## अंक दुसरा.

### प्रवेश १.

### स्थळ—पुणें—रामशास्त्री याचें घर.

### वेळ—मध्यरात्र.

( रामशास्त्री आणि नाना फडनवीस बसले आहेत. )

**राम०**—नाना, आज असें कोणचें काम नडलें होतें, कीं आपणास स्वतः या अप्रशस्त झोपड्यांत यावें लागलें ? मला सूचना झाली असती तर मी हवें तेथें आलों असतों—

**नाना०**—पण या—येवढ्या मोठ्या मानास—हा आपला शिष्यवर्गांतरगत नाना पात्र नाहीं. आपण यावत् ब्रह्मवृंदांस गुरुस्थानापन्न आहां, इतकेंच नाहीं—तर साऱ्या पे-

शवाईस भूषणप्रद आहां! आपणांस **"साक्षात् न्यायमूर्ति"** असें आबालवृद्ध—ह्मणतात यापेक्षां आपली आणखी **कृतकार्यता** ती कोणती! असो. मी ज्या कामाकरितां आलों आहें, तें काम अत्यंत महत्वाचें आहे. त्यांत आपल्या सुमतीची आणि सम्मतीचीही पण विशेष आवश्यकता आहे.

**राम०**—तर तें निःशंकपणें सांगावें—एथें या वेळीं एकांत आहे.

**नाना०**—ऐकावें—ब्राह्मणवर्णांत हल्लींच्या **पेशवाई**—सारखी—**अतुलप्रभा—अपूर्व राजसत्ता** यापूर्वी कधींही—कोणाही ब्राह्मणास, प्राप्त झाली नव्हती हें निर्विवाद आहे. फार तर काय—पुराणांतरीं देखील अस्सें **ब्रह्मवैभव** वर्णिलेलें कुठें आढळत नाहीं! असा **अलभ्य अपूर्व पदार्थ** ज्या **पेशव्यांच्या पूर्वजांच्या पुरुषार्थानें ब्राह्मणांस** प्राप्त झाला आहे—त्याचें **मातेरें** करण्याचा प्रयत्न—त्याच **पेशव्यांच्या वंशजांनीं** व त्यांच्याच **ब्राह्मणकारभाऱ्यांनीं** करणें, यासारखें **ब्राह्मणजातीस कलंक** लावणारें **निंद्य** कृत्य तें कोणतें?

**राम०**—त्यासारखें **निंद्यतम—नीचतम कृत्य** तें तेंच—पण तें चाललें आहे कोठें हें स्पष्ट सांगावें! (साश्चर्य मुद्रेनें पहातो.)

**नाना०**—शास्त्रीबोवा! तें कुठें चाललें आहे हें आ-

पणांसही माहीत असेलच. आणखी माझ्या तोंडून ऐकण्याची इच्छा असल्यास—ऐकावें:—**दादासाहेबांचें** घर हें कारस्थानाचें **माहेरघर** बनून राहिलें आहे—सदा—सर्वकाळ त्यांत ह्मणून **खलबतें** जारी आहेतच ! त्यांतही **विशेष**—आपल्यास **सगळा शहाणा** ह्मणविणाऱ्या **बापूचें** त्यांत अंग !

**राम०**—काय **सखारामबापू**—तशा कामास सम्मत !

**नाना०**—दादांचे कलेजेच ते. दादांवांचून राहतील कसे ?

**राम०**—**परमाश्चर्य** ! आधीं आपल्या **आत्मसंतोषानें नारायणरावसाहेबांस गादी** देऊन आतां ती मंत्रणा किमर्थ ? स्वतः आपणाला गादी मिळावी ह्मणतात कीं काय **दादा** ?

**नाना०**—तोंडानें ह्मणत नाहींत—पण कृतींनीं ती मिळवूं पहाताहेत !

**राम०**—त्या कृति कोणत्या ?

**नाना०**—त्या इतक्या भयंकर आहेत कीं कानांवर पडतांच अंगावर शहारे येतात ! त्या सुकुमार **ब्रह्मराजकुमारा**चा घात करण्याविषयीं अनेक खटपटी चालू आहेत ! **विषप्रयोग** उघडकीस आले ह्मणून आतां गुप्तरीतीनें जारणमारणादि प्रयोग चालले आहेत !

**राम०**—शिव ! शिव ! शिव ! कोण अघोर कर्म हें !! हे चांडालि राजसत्ते ! तुझ्या अशा अनन्वित कृतींवरूनच तुला—आमच्या पूर्वजांनीं आपल्या घरांत शिरूं दिली नव्हती !

**नाना०**—पण ते बेटे मंत्रप्रयोगही लंगडे पडूं लागले ह्मणून आतां **शस्त्रप्रयोग** अमलांत येऊं पहाताहेत!

**राम०**—काय! रक्तपातावर येऊन बेतणार ह्मणतां? चुलत्यापुतण्यांत आणि **रक्तपात! अधःपात!! अधःपात!!!**

**नाना०**—शास्त्रीबोवा! अहो **अधःपाता**ची बातही ज्यांच्या गांवीं नाहीं—ते **महापातकी**—आपल्या दावेदाराचा घात—पात परदेशीं—परभारें परकीयांकडून होत असल्यास कां न करतील हो?

**राम०**—हें काय गूढ आहे बोवा?

**नाना०—गूढ**—पण आतां उघड झालें आहे! परवांच्या दिवशीं नारायणरावसाहेब—नाशकाहून भरदौड आले हें आपणांस कळलें असावें.

**राम०**—होय—कांहीं स्वारांनिशीं भरधांव दौडत आल्याचें कळलें. तर त्याचें कारण तेंच कीं काय? मारेकऱ्याच्या मारांतून पार पडणें?

**नाना०**—तर दुसरें काय? "**औरंगाबाद**च्या सुभ्याचा छापा **रावसाहेबांवर** पडून ते ठार होणार" अशी बातमी मला ऐनवेळीं लागल्यावरून—मी त्यांस रातोरात पळवून आणविलें! **दादां**च्या दुर्दैवानें ह्मणा—कारण त्यांचे पांच लाख रुपये त्या कामीं खर्ची पडल्याची बातमी आहे—अगर **पेशव्यां**च्या पुण्याईनें ह्मणा—तो **अ-**

श्वत्थामी बेत उघडकीस आला—ह्मणूनच श्रीमंतांचे पाय पुनः या पुण्यवान—पुण्यास लागले !

**राम०**—( सद्गदित होऊन ) आहाहा ! आपणांस आपल्या अलौकिक **चातुर्यचमत्कृतीवरून**, असें ह्मणणें भाग आहे, कीं—ब्राह्मणमात्रांचा पुण्यसंचय, त्यांचा **राजकार्यधुरंधरपणा**—सर्व पृथ्वीवर प्रकाशित करण्यास्तव **नानारूप** धारण करून, या **पुण्यपत्तनीं** विराजमान झाला आहे! आपणासमान दूरदर्शी चतुराग्रणी **मंत्रीवर** या **पेशवाईस** प्राप्त झाला नसता, तर—ही केव्हांच **झोटिंगशाई** बनून, विलयाप्रत पावली असती ! त्या विषप्रयोगादि मारांतून, तो सुकुमार **ब्रह्मराजकुमार**—कसचा पार पडता ! व काळच्या छाप्यांतून तरी तो कसचा वांचता ! हीं सर्व आपल्याच अद्वितीय दूरदर्शितेचीं व अपूर्व चातुर्याचीं अलभ्य फळें होत ! मीं कधीं-ही—कोणाही नराची उगीच स्तुति केली नाहीं—व आपली-ही करीत नाहीं—आपली विलक्षण **राजकार्यदक्षता** पाहून, माझ्या मुखांतून जें यथार्थ होतें तेंच बाहेर पडत आहे !

**नाना०**—हा आपल्या दिलाचा दिलदारपणा—निर्मलपणा! पण—आतां आमचें सारें शहाणपण लटपटूं पहाताहे हो शास्त्रीबोवा ! "**रावसाहेब वांचतात** कसे आणि **पेशवाई** बचते कशी" हा **चिंत्ताग्नि** या देहास रात्रंदिवस

दग्ध करीत आहे! अशीच अंधाधुंदी–बेबंदी आणखी कांहीं दिवस चालली तर, हा आपला शिष्य–नामशेष मात्र राहील!

**राम०**–तर ती बेबंदी कोणत्या उपायांनीं बंद करावी ह्मणतां?

**नाना०**–मी ह्मणतों ती स्वच्छंदी **राक्षसी** त्या **राक्षसद्वयासुद्धां** आमरण बंदींत घालावी–ह्मणजे या पेशवाईतील सारे फंदफितूर बंद होतील!

**राम०**–(साश्चर्य) तें राक्षसद्वय कोण? दादा बापू कीं काय?

**नाना०**–तर दुसरे कोण!

**राम०**–शिव शिव! ते दोन तर या प्रचंड **पेशवाईरूपी राजभवनाचे सुदृढ–मुख्य–आधारस्तंभ होत!**

**नाना०**–दिसायला मात्र **सुदृढ**–पण आंतून स्वार्थरूपी भिरडभुंग्यानें पोकळ केलेले ते दोन्ही **खांब** आणि ती किडकी कुजकी **तुळई**–हीं त्या प्रचंड इमारतींतून जल्दी काढून टाकलीं पाहिजेत.–आणि त्यांऐवजीं भक्कम टेंके देऊन तीस मजबूत केली पाहिजे–नाहींतर ती डळमळीत इमारत केव्हां जमीनदोस्त होईल याचा नेम नाहीं!

**राम०**–हा–हा! हें जर सत्य असेल तर–**आह्मां ब्राह्मणांची सद्दी** सरली ह्मणायची! पण नाना, तुह्मीं या

गोष्टींचा पक्का छडा काढला आहे का हो ? सखारामबापूसारख्या पुऱ्या मुत्सद्याकडून त्या **ब्रह्मराज-हत्येस**-एवं यावत् **ब्राह्मणजातिगौरवविघातक कृत्यास** उत्तेजन मिळेल-असें माझी मनोदेवता मला सांगत नाहीं ! आणि **दादांसारखा ब्रह्मकुलोद्भव** रणशूर अशा **असुरी कर्मास प्रवृत्त** होईल असेंही पण वाटत नाहीं. ते सारे खेळ त्या कौसाली **कलिकैकेयी आनंदीचे** असावेत असें वाटतें-ह्मटलें आहे नाः-"किं न कुर्वंति योषितः" !

**नाना०**-होय-पण ते **कलिदशरथ** आपल्या आत्मलिंगासुद्धां तिला अनुकूळ झाले ह्मणून ! शास्त्रीबोवा ! त्या एकट्या स्त्रीची-औरंगाबादच्या सुभ्याशीं धोरण बांधून **रावसाहेबांस** ठार मारविण्याचें कारस्थान इतकें बेमालूम करायची काय बिशाद ! त्या साऱ्या मसलती वासलती त्या **त्रिकुटाच्याच** ! पण आजपर्यंत त्यांच्या कवटाळाची डाळ शिजली नसल्यामुळें तें चांडाळत्रय फारच पिसाळलें आहे ! त्यामुळें कोणावर काय प्रसंग केव्हां येऊन गुजरेल याचा नेम नाहीं. ह्मणून ह्मणतों-अशांतच हा अश्रेयस्कर कारभार द्यावा सोडून, आणि एकाद्या महाक्षेत्रीं वास करून आपला शेवट गोड करून घ्यावा.

**राम०**-वाहवा ! कोण भ्रम हा ! अशानें का आपला शेवट गोड होणार ?-का कडू कडू विष होणार ? हें **पेशवाईरूपी** तारूं-अशा तुफानांत सांपडलें असतां-

आपण त्याच्या मुख्य चालकांनीं—त्यास भरदर्यांत का सोडून जायाचें ? मग आजवर त्यास सुसूत्र चालविल्याचें श्रेय तें काय ? उलट कोट्यवधि प्राण्यांस—दुःखसमुद्रांत लोटल्याचें पाप मात्र माथीं बसेल आपल्या ! ह्मटलें आहे नाः—

"प्रलये भिन्नमर्यादा भवंति किल सागराः ।
सागरा भेदमिच्छंति—प्रलयेऽपि न साधवः ॥"

**नाना०**—हें मी जाणून आहें. पण करावें काय ? ते बिलंदर लुटारू—तें तारूं सफाई लुटायासाठीं, टपून बसले आहेत ना ! त्यांस पकडून जन्मकैदी करून ठेवल्यावांचून, तें सुरक्षित ह्मणून राहयाचें नाहींच— हा सिद्धांत ! त्या राजद्रोह्यांस हें शासन कमीच !

**राम०**—पण त्यांजवर **राजद्रोहदोष** सिद्ध झाला पाहिजे ना—नाहींतर दादांचे पक्षपाती बंड करून सर्व राज्यांत पुंडाई माजवितील—

**नाना०**—पण ते—पुंडांचे नाईक बंदींत पडले कीं—ते लुंगे बंड जागच्या जागींच थंड पडणार !

**राम०**—पण मी ह्मणतों "धीरो भूत्वा द्रावय शत्रुम्" या न्यायानें दादाबापूंस एकवार सख्त ताकीद देऊन पहावी—आले ताळ्यावर तर बरें—नाहींतर आपलें तें शेवटलें सुदर्शन आहेच !

**नाना०**—पण अशानें उलट असें होणारः—

"पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनम्"

या शिवाय वक्त हातचा जातो—पाटीलबोवाचे तोंडची ही कबीरोक्ति ऐकली असेलच आपण:—

"कल्ह करे सो आज कर—आज करे सो अब्ब"
"पलमें परलय होयगा फेर करेगा कब्ब."

**राम०**—हेंही खरेंच! एथें तर आपली मति कुंठित झाली बोवा! "इकडे आड तिकडे विहीर"! जें आपणास योग्य दिसेल तें करा—

**नाना०**—तर त्या त्रिकुटास उचलून घालूं कैदेंत? आहे आपणांस कबूल?

**राम०**—यावांचून गत्यंतर नाहींच काहो? मी ह्मणतों त्यांची खोड अशी मोडावी, कीं कोणी आपणांस खोड ठेवूं नये—"सांप मरे पै लाठी न टूटे" या हिंदुस्थानी ह्मणीप्रमाणें करावें—

**नाना०**—तर त्याला एक तोड आहे—ही खोडकर जोडी त्या नोडग्या **हैदरावर** घालावी—ह्मणजे—"दुष्मन पर दुष्मन चढे—एक गिरे या दोनो पडे"—या दोहोंतून एक तरी घडणारच!

**राम०**—वाहवा! हें तर उत्तम! "विषस्य विषमौषधं" हा न्यायच आहे—

**नाना०**—तर भरवितों दरबार उद्यांच—आणि दाद प-देतों भर. **दादा** तर **रणनवरे** आहेतच. युद्धाचें नांव गट्टी कतांच हुरळतील! मग **बापू** तर त्यांचें आत्मलिंग **फूट**—

रोबर असणारच ! तर करतों असें—येतों आतां—( उठून पुनः बसतो. ) हो हो—पण एक फार महत्वाची गोष्ट विसरलों होतों—

**राम०**—तर ती सांगावीच—

**नाना०**—आतांशीं—**श्रीमंत** अंमळ स्वतंत्रपणें वागूं लागले आहेत—त्या तोंडपुज्या **बाबाजी बऱ्यांच्या** नादीं लागून—आमच्या सांगण्या—शिकविण्याकडे दुर्लक्ष करूं लागले आहेत ! हें आपणांसही माहीत असेलच. अशी वागणूक—अशासमयीं त्यांचे जिवास अपायकारक होण्याचा संभव आहे—शिवाय **बऱ्यांनें** खोरें लावलें आहे तें वेगळेंच !

**राम०**—तर यांत आपणांकडेही कमीपणा येणार आहे. ( हसून ) कसा ह्मणाल तर ऐका—आधीं **श्रीमंत** पडले हूड—त्यांत **राज्याधिकारारूढ**—तशांत आपली मुद्रा—पडली **प्रौढ**—अर्थात् आपलें हास्यविमुखमुख—पाहून आपणापासून राहवेल तितकें दूर राहणें—आणि त्या हास्यमुख **समवयस्काची** संगति धरणें—अशा वयांत अशा **वैभवांत**—आवडणें हें साहजिकच आहे **श्रीमंतांना** !

**नाना०**—( खोंचून ) आमचें **हास्यविमुकमुख**—अर्थात् **सुर्दख** पाहणें देखील ज्या **श्रीमंतांना** आवडत नाहीं तर—**नीमंतां**जवळ आमचें राहणें तरी काय उपयोगी ! आपली '**प्रौढ मुद्रा**' सोडून—त्या **हूडास** खुष

रोबर असणारच ! तर करतों असें–येतों आतां–( उठून पुनः बसतो. ) हो हो–पण एक फार महत्वाची गोष्ट विसरलों होतों—

**राम०**–तर ती सांगावीच–

**नाना०**–आतांशीं–**श्रीमंत** अंमळ स्वतंत्रपणें वागूं लागले आहेत–त्या तोंडपुज्या **बाबाजी बर्व्यांच्या** नादीं लागून–आमच्या सांगण्या–शिकविण्याकडे दुर्लक्ष करूं लागले आहेत ! हें आपणांसही माहीत असेलच. अशी वागणूक–अशासमयीं त्यांचे जिवास अपायकारक होण्याचा संभव आहे–शिवाय **बर्व्यांनें** खोरें लावलें आहे तें वेगळेंच !

**राम०**–तर यांत आपणांकडेही कमीपणा येणार आहे. ( हसून ) कसा ह्मणाल तर ऐका–आधीं **श्रीमंत** पडले हूड–त्यांत **राज्याधिकारारूढ**–तशांत आपली मुद्रा–पडली **प्रौढ**–अर्थात् आपलें हास्यविमुखमुख–पाहून आपणापासून राहवेल तितकें दूर राहणें–आणि त्या हास्यमुख **समवयस्काची** संगति धरणें–अशा वयांत अशा **वैभवांत**–आवडणें हें साहजिकच आहे **श्रीमंतांना** !

**नाना०**–( खोंचून ) आमचें **हास्यविमुकमुख**–अर्थात् ह. [illegible] मुद[illegible]ख पाहणें देखील ज्या **श्रीमंतांना** आवडत नाहीं तर–ना[illegible]मंतांजवळ आमचें राहणें तरी काय उपयोगी ?

[illegible]पली '**प्रौढ मुद्रा**' सोडून–त्या **हूडास** खुष

करण्याकरितां—त्या **छचोर बर्व्या**सारखा **हंशा** करीत का बसणार **श्रीमंतां**जवळ ?

**राम०**—(हसून) मीं आपलें सहज ह्मटलें हो नाना!—राग मानूं नका—इतकें माझें ऐकाच—आपणाकडून होईल तितकें करून—**श्रीमंतां**च्या इच्छेस अनुसरून—त्यांस अनुकूल अशी वर्तणूक ठेवाल तर—त्या **बर्व्या**चा बंदोबस्त हां हां ह्मणतां करतां येईल.

**नाना०**—तर मजकडून मीं **श्रीमंतां**शीं प्रतिकूल अशी वागणूक ठेविली नाहीं. व त्या **बर्व्याचा**ही तसा बंदोबस्त केला आहे परभारें!—पण ह्मटलें वेळ आहे कठीण—आपल्या कानांवर घातलेलें असावें—त्या कारस्थानी **नरनारी**-वरही **चोरपाळत** ठेवली आहे ह्मटलें! बरें—येतों—तर नमस्कार ! (नमस्कार करतो.)

**राम०**—(उठून उभे राहून) नमस्कार ! फार फार उत्तम केलेंत ! (नाना जातो.) **नानासारखा समयज्ञ—धूर्त चाणाक्ष नानाच** ! पण त्यांतही थोडी गोम आहे ! आपल्या शहाणपणापुढें इतराचे शहाणपणाचा प्रकाश पडूं देऊं नये—ही त्याची सोळा आणे इच्छा ! पण तीच इच्छा—त्याच्या अनेक अलौकिक सद्गुणांस आच्छादून दुर्लौकिकास कारणीभूत होताहे ! तसाच **सखाराम बापू** पडला पट्टीचा शहाणा पण हट्टी स्वभावाचा ! तर त्या दोघांची गट्टी जमावी कशी ? शिव शिव!! अशीच आपसांतील **फूट**—

आमच्या **पेशवाईस** अपायकारक होते आहे! त्या दोघां मुत्सद्यांच्या झटापटींत—त्या तिसऱ्या कपटपटु **बऱ्यांची** पोळी पिकली आहे! मारतो आहे हात **दौलतीवर**!!—कलिकाला! या **भूदेवराज्यांत**ही तुझा बोलबाला झाला ना!!! **हरेरिच्छाबलीयसी**! (पडदा पडतो.)

---

## अंक दुसरा.

### प्रवेश २ रा.

**स्थळ—पुणें**—शनवारचा वाडा. आनंदीबाईचा महाल.

**वेळ**—प्रहरदिवस—

(**आनंदीबाई** लोडाशीं टेंकून सचिंत बसली आहे. **गजी** पुढें उभी आहे.)

**आनंदी०**—तर गजे, तूं अजून कांहींच केलें नाहींस ह्मणायचें?

**गजी**—काय म्हून जी अर्स्से ह्मनायचें? अजी या चौ दिसांत—या गजीचें पाय—खिनभर तरी एक्या जागीं असायचें होतें! कुठ्ठे वानोडी अन् कुठ्ठे पुन्नें—पन इन्नें तित्थ जाजाऊनशनी, हिन्दुस्तानी लोकांचें कंपून् कंपू हुडुडकून सोडलें समर्दे! अन् त्यांतलें जवानन् जवान हेहेरून घेतलें सारें! (हसते.) काय काय त्या इचित्तर मुर्ती ह्मंताकुनी भलें गललठ्ठ—पन् मेलें अक्षी मठ्ठ! कुनी ह्मनें "हम बडे रनसूर"—पन दुवाड सदा भांगेत चूर! कुनी बघा—हेल्यागत मजबूत—पन मेलें— येडंइद्रें जसें भूत! अर्स्से—

तस्सॅ—धडाचॅ ना गोडाचॅ मेलॅ कैक हैत! पन मनासारखा कुनी **माईचा पूत—जातीचा रजपूत—वचनाचा मजबूत**—कुन्नी कुन्नी बी दिसच्चना!

**आनं०**—अग, हेंग काय? असें ह्मणतीस तरी काय? त्या पुरभय्यांतही कुणी तसा नाहींच काय? हाय हाय!

**गजी**—पन बाईसाब,—पुरॅ ऐकून तरी ध्याल काय? काय मज्जा झाली बघा—(हंसते.) ह्मनूत्यात ना—"मूल कडेवर अन् धांडोरा शहरभर"! तसी गत झाली अन् काय! अजी आपल्या गाव्यां मंदीच गावला योक **बाका जवान!** त्याचा खाकाच येगळा बघा—अक्षी ऐटींतच! त्यो बरीक आपल्या कसास उतरॅल—पन मेला बसांत येईल का नाहीं कोन जानॅ बाई!

**आनं०**—कां बरें बसांत येणार नाहीं? तुझ्या **'अनूप' रूपाला** भाळत नसल्यास त्या **'बड्या रुपैयाला'** तरी भुलेल ना?

**गजी**—तसा बी रंग दिसत नाहीं. त्यो बडा सादू है जी.

**आनं०**—तर मग साधलेंच समज. साधूच कामसाधू असतात. पण तो भोंदू जातीचा ब्राह्मण तर नाहीं ना?

**गजी**—बिऱ्हाम्मन नाहीं **रजपूत** है—पण बिऱ्हामनाचे वर त्याचा आचार अन् इचार! त्याच्याकडॅ बघतांच समाधान होतया:—कपाळीं ढवळ्या गंधाचा दुबोटी अडवा पट्टा—किती खुलतोया! गळ्यांत रुद्राक्षांच्या माळा

कशा रुळत्याती ! अंगाला इभूत ल्यालेला जनु का सिव-संकर दिसतोया ! हातीं सुमरनी सदा फिरतच असतिया ! तोंडी "सीताराम ! सीताराम" म्हून चाल्लर्लच असतया ! नित रातीं रामायनाची पोथी किती पिरमार्न वाचतोया ! ती सरवन करूनशनी सुरत्यांच्या नेतरांतून पिरमाच्या धारा चालत्याती ! त्याच्या तोंडून रामकथा ऐकन्यापाईं-समदे परदेसी भाई त्याच्या इथ्थं जमत्याती—

**आनं०**—तर तो मेला **माळफेऱ्या "सटकसीताराम"** ग काय कामाचा ? जो रडवा पुरभय्यांला ही रडवितो—तो तसल्या लढाईचे प्रसंगीं तर खास रडणार !

**गजी**—अजी त्यो रडवा नव्हं कडवा जवान—दोन्ही कामीं समसमान ! जसॅ रामायनीं रामभगतांस त्यो पिरमार्न रडिवतो, तसॅच मैदानीं—दुस्मानाख्री बी भयार्न थरथरां कांपवितो न् कापून बी टाकतो ह्मतलॅ ! त्याचे पट्ट्याचे हात फेकन्याची सफाई पाहून तर—असॅ वाटतया कीं—परतक्ष **काळाला** बी लोळवील ह्यो **कर्दनकाळ** ! बडॅ बडॅ अड्डमाड्ड बी त्याला "वस्तादजी !" "वस्तादजी !" ह्मनूत्यात ! योक पठ्ठा—जातीचा पठ्ठान—भल्लाधिप्पाड जवान—नांवाचा **आस्मानखान**—एकला हजारांस भारी—त्याच्या दारीं—त्याचा सागीर्द बनून—कुत्र्यावानी पडलाया !

**आनं०**—तर धन्य पारख ह्मणायची माझ्या गजाऊची ! असा अष्टपैलू पुरुष तर विरळा—चुकूनच मिळायचा ! वाहवा गजाऊ वाहवा !

**गजी**–माजी जी कसली **पारख अन् वाहवा**?–या पायाचा **परताप** ह्यो! ह्मनूनच ऐसा परतापी **पुरूस** पटकन गावला! इकडॅ–**"भगतजी"** तिकडॅ **"वस्तादजी"** हिंदुंवर **छाप**! मुसलमानांवर **दाप**!

**आनं०**–त्याचें नांव ग काय?

**गजी**–त्याचॅ नांवानॅ बरीक त्याची कळा खाल्ली! त्याचॅ नांव **सांबरशिंग**!

**आनं०**–काय ह्मटलेंस सांबरशिंग? वेडी तर नाहींस? माणसाचें नांव **सांबरशिंग**?

**गजी**–व्हय जी! **सांबरशिंग जमादार** ह्मनत्यात त्याला. आपून बी पाहिलाय त्याला–कदीमदी येत असतोया धनीसाबाकडॅ!

**आनं०**–सुमेरशिंग जमादार कीं काय?

**गजी**–व्हय जी व्हय–त्योच त्यो! **सुम्मर** का **सांबरशिंग**!

**आनं०**–(हसून) गजे! मेले तूं लहानाची मोठी आमच्या इथें झालीस–पण तुला ह्मणून शुद्ध बोलतां नाहींच आलें!

**गजी**–काय ह्मन्ता बाईसाब हें! अजी, मी आपल्याकडॅ **सुद्द** धरून किति **सुद्द** बोलत्येया–समदॅ चाकरमानॅ मला ह्मनत्याती कीं "**गजाबाईचॅ** बोलनॅ चालनॅ समदॅकाई **सुद्द**–बिरामनागत!" पन करमभोग ह्मनायचा माझा–बाईसाब

माझँ बोलनँ समद **असुद्द** वाटतया! मी का त्या वाईदेशी **बजी**गत–'हत्त' 'तत्त' 'हकर्ड' 'तकडँ' 'द्वार'–'प्वार' 'ग्वाड' 'ख्वाड' करत्येया ? असो. आह्मां सुदराखी स-मर्द **सुद्द** बोलनँ तरी करायचँ काय ? बिऱ्हामनाखी **सुद्द** अन् आह्माखी **बुद्ध** असली ह्मंजी बस्स! ज्याला **सुद्द** है त्याला **बुद्ध** नाहीं–ज्याला **बुद्ध** है त्याला **सुद्द** नाहीं–कुठ्ठे काई कुठ्ठे काई–योक हई योक नाहीं. अस्सँच ऱ्हाटगाडगँ चालायचँ जगामंदी!

**आनं०**–(हंसत) भले शाबास! तर तुझ्या मतें तुला **बुद्ध** आहे–आणि आह्मी **शुद्ध अबुद्ध** ना?

**गजी**–हें का या बटकुरानँ सांगावँ? आपलँ आपू-नच हेरावँ–मनाला इचारावँ–म्हंजी चटसारँ ध्येनांत येईल! ज्याला म्हून **बुद्ध** है–त्यो का आपलँ राजपाट वैऱ्यासखी देऊन–आपून–बोलूंच का? नको बाई—

**आनं०**–(डोळ्यांस पाणी आणून) अग, आणखी ग काय बोलणार तूं? आह्मी आपलें सर्वस्व घालवून बंदीवान हो-ऊन बसलों हेंच ना? शिव शिव! इतके **निर्बुद्ध–निर्लज्ज** आह्मी ठरलों ना–कीं दासदासींनीं देखील आह्माला **गद्धयांत** ढकलावें!

**गजी**–अबा–बा–बा! इकूत्याशा बोलन्याचँ इकूतँ का केलँ आपून? मी आपली उगीच–सहज–इनोदानँ हव[illegible]ल्यें की जी!

**आनं०**—हें का मला कळत नाहीं ? तूं बोललीस तें ारें खरेंच "आधीं जाते **बुद्धि** मग जाते **लक्ष्मी**" ह्मण- ात तें का खोटें ! पुरें घेरलन् आह्माला अवदशेनें ग बाई !

**गजी**—आपल्या वैऱ्यास्नी घेरलॅ तिनॅ आजपून ! ह्म- ्नशनी आपली संपली साडॅसाती—अन् ह्मनूनच त्यो बाका ारङ्ग उमगला !

**आनं०**—तुझ्या तोडांत साखर पडो ! खरेंच गडे, तो ुमेरशिंग कीं नाहीं—मीं कितीकदां पाहिला आहे ! तो देसण्यांत तर बाणेदार दिसतो ! पण तो इतका **वजनदार-** तचा **सच्चा सर्दार** असेल असें वाटलें नव्हतें—तर आतां उशीर नको. गांठ जा कशी त्याला कसेंही करून. ो एक आपला **मिंदा—बंदा** बनला की झालेंच आपलें काम **फत्ते** !! मग ग काय—ते सारे **गार्दी** हिन्दु- स्थानी आपलेच ! मग त्या **चांडाळचौकडी**च्या घरादारां- वर नांगर फिरलाच ह्मणून समज. मग आह्मी **महाराजाचे महाराज** ! मग काय—मी आपल्या या **सईबहिणीला** का विसरेन ? (तिला पोटाशीं धरून) **गजराराणी** करीन ह्म- टलें—**मोठ्या राज्याची मालकीण** !

**गजी**—(मोठ्या कौतुकानें) खरॅ च का जी बाईसाब ! मह्मा—**रानी** कराल आपून ? मंग ही **गजरारानी** कनई— त्या **अहिलाबाई** होळकरनीला बी मार्ग सारील बघा—**अ- चाट** करनी ककरूनशनी !

**आनं०**—यांत ग काय संशय! पण आधीं **धनिणीला** तर—**गादी** मिळूं दे ! मग तूं हो **गजराराणी** !

**गजी**—त्याला जी आतां काय येळ ! जात्यें **वानो-डीस** अन् करून येत्यें समदा बंदोबस्त—ब्येस अक्षी !

**आनं०**—भले बहाद्दर! शिपाई असावा तर असा फाकडा !—पण का ग गजे, तुला—या छेलछबिलीला—दागदागिन्यांनीं लदलेलीला—**पुरभय्यांचे कंपूंत** कुणी **'मज्जाव'** करीत नाहींत?—"तूं कोण? कुठली? कुणाकडून आलीस? कुणाकडे जातीस? कोणत्या कामाकरितां" वगैरे नाहींच का पूस तपास करीत कुणी? शिवाय तूं दोन दोन-तीन तीन दिवस तिथें कुणाचे इत्यें राहतीसग?

**गजी**—(मुरडून) अजी तें आपून पुसूं नये—अन् मी बी सांगूं नयेच ! या गजीचे कसब गजीच करूं जानें ह्मतर्लें—

**आनं०**—तरी पण—तें आह्मीही पण जाणलेंच पाहिजे ह्मटलें !

**गजी**—लज्जा वाटती बाई—सांगायलाजी—

**आनं०**—अहो पण **लज्जावतीबाई** ! अंमळ लाजलज्जा गुंडाळून ठेवून—सांगाच—तें आपलें **अजब कसब** !

**गजी**—सांगूच तर? ऐका तर—अजी ही गजी—**बैरागन बनून** जात असतीया तिथ्थें **"सीताराम सीताराम"** करीत! (हंसून) मंग मला जी कोन करतेया 'मज्जाव'! जो तो ह्मनतोया 'आव आव!' 'कुछ

हरका भजन सुनाव' 'पांव लागू माई!' सिवाय तिथ्थॅ—माझी सक्की भन **ठक्की**—मजपरीस पक्की एक्या नाइकाची औरत है! तिच्या इथॅ राहत असत्यें मी साधुसंतावानी अलग—'अल्लख' जागवीत!

**आनं०**—(तोंडाला बोट लावून) अगॅ हें काय ऐकतें मी? तूं—का **बैरागीण** बनून जात असतीस तिथ्थें? आणि तिथ्थें ही तुझी बहीण—तुझ्याहून पक्की—नांवाची **ठक्की** राहात असते? तर जुळलें! ह्मणूनच गजाऊची धांव भय्येलोकांकडे! आणि त्यांच्या बोलीचालीची आवड! (हंसून) पण गजाबाई, ते बारभाई—'माई माई' करतां करतां करतील 'काई बाई' बरॅ का!—खरेंच सांग—ही गोरी गोरी पान—तरणी ज्वान रंगेली 'बैरागन' पाहून ते मेले चंगीभंगी—भुलून लागत नाहींत का गे मागें?

**गजी**—(हंसून) ते मागॅ लागल्याबिगर—आपला लाग कस्साजी लागॅल? अन् ते भुलल्याबिना खुलतील कस्सॅ? अन् खुलल्याबिना वळतील कस्सॅ? बाईसाब! तें कसबच न्यारॅ बघाः—कुन्नापशीं घुसून बसायचॅं—कुन्नापसनॅ रुसून उठायचॅं—कुन्नाकडॅ हसून बघायचॅं—अस्सॅ कैक थेर ककरून—समद्यास्नीं घेघेरून—हेहेरून—काम सादून घ्यायचॅं ह्मतलॅ अपलॅ! फुक्काचा का लागलाया "दुनया झुक्काना"?

**आनं०**—धन्य बाई, तुझा "दुनया झुक्काना." पण गजे, तुला थेट बैरागिणीसारखें शुद्ध हिन्दुस्थानी कुठें येतें बोलतां?

**गजी**—मी आपली दखनी बैरागन! दखनी हिन्दुस्थानी बोली बोलत्यें थेट हिन्दुस्थानी झोक आनूनशनी! अजी त्या उल्लूंसूनी भुलवायला **सुद्दबिद्द** लागत नाहीं. त्यांची **सुद्दबुद्द** हरायला त्या—**हजारनूर नखऱ्याचॅच** काम बघा! अजी बाईसाब! जव्वा का ही सज्जिली गजी—कटीवर कर ठिवून—दीडपायावर उभी राहून—हनवटीस बोट लावून—भिरकुटीच्या कमानीवर नयनांचें तीर तानून "**चल सरक**" ह्मनून मुरकतीया—तव्वा कनई—सारॅ मरद्द अक्षी **सरद्द** होऊन जात्याती अन् काय!!!

**आनं०**—(हसून) याचें नांव **मुरकणें**! अहाहा—असें तें **सुंदर ध्यान** दृष्टीस पडेल तो सुदिन ह्मणायचा! तर **गजराबाई**! तें मेलें 'सांबरशिंग' तुला ग काय भारी—एका **मुक्यींत गर्क** करून सोडशील कींग त्याला!

**गजी**—पन त्यों माझ्या **मुर्क्यांचे गर्क्यांत** गावल तव्वाना? हज्जारो नखरॅ ककरून थकलें! पन त्यो **शुक अवतारी**—बघॅना बी या **नागीन नारी**कडॅ! काय करूंजी?—त्या **शिंगापुढॅ** मातर माझी **पुंगी बंद** पडतीया! तरी चिंता काय—त्याचा त्यो चेला—पठान—करत्ये आपला चेला! त्यो मेला पुरा नादीं लागलाया माझ्या!—मला बघूताच—पडतोया पाया—ह्मनतोया कसा:—'जोगीजी आदेस!'

**आनं०**—अग पण तो तर **यवन**! झोंबल बिंबल अंगाला! जात बीत घेशील घालवून—

H8116

**गजी**—अजी या **राजकारनीं** जातीची पोकळ पंचाईत करतया कोन्? अन् ती तरी जातीया कुठं मेली! गेलीच तर आनीन धरून! दो चौ अन्यांचा खुर्दा टाकीन कुन्या भट बिऱ्हामनापुर्ढं—अन् घेईन त्यच्या चरनाचं **तिरथ्य**—अन् होईन **सुद्द**—अक्षी **पवितरं**! है काय त्यांत **अरथ्य**! आपून ह्मनता "**त्यो तर यवन**"! पन—अपनाला तर मानकाप्याचच्चं काम है ना? शिवाय त्या चेल्याची **दाढी** धरली—कीं त्या गुरुजीची **शेंडी** आलीच हातीं म्हून समजावी! त्याचीच सी काय—जगाची रीतच अस्सी—अंदी **नंदीला** नमन! मंग—**नंदीपतीला दंडवत**!

**आनं०**—तर तसें तरी कर! त्या पठाणास तरी गांठ लवकर!

**गजी**—जी आज्ञा! निघालेंच ह्मना—(दूर पाहिलेंसें करून) पन ह्यो कोन येतोया इकडं—? धनीसाब कीं काय?

**आनं०**—(दादासाहेबांस येतांना पाहून) तेच ते—! आमचे नंदी! (हंसते)

**गजी**—वाहजी वाह्! आज सवारी **लस्करी** थाटानं येतीया—निम्याजाम्यानिशीं—हत्यारबंद अक्षी!—खुप खुसींत दिसतीया! तर आपून बी खुसींत खुस्स करून, साधून घ्यावंच तें!—जातें बाई—मला बघतांच डोळं वट्टारतील—(जाते.)

(**राघोबादादा** लगवगीनें येऊन **आनंदीचा** हात धरतो—ती आश्चर्यमुद्रेनें त्याजकडे पहात उभी राहते.)

**राघो०**—(तिच्या तोंडाकडे पाहून) यौंरे यौं! आज प्यारीचा दिल खुष दिसतो आहे!

आनं०—दिलदारीच तशी त्या प्यारीची!

राघो०—ती—हीचना प्यारी? (तिचे हनुवटीस हात लावतो.)

आनं०—ती तर तीच. 'ती' कुठें 'ही' होत असते?

राघो०—तर ती कोण बुवा?

आनं०—ती बुवा नाहीं—ती अवा! आज कुठली ही हेंगाडी बोली काढली बाई! 'ती'! ह्मणे 'ही' आणि अवा ह्मणे बुवा!

राघो०—अग ती अवा कोण?

आनं०—ती खुनी—वेसवा!

राघो०—खुनी वेसवा? ती ग कोण?

आनं०—अहो ती निसंग—नंगी यवनी!

राघो०—नंगी यवनी? आणि आमची प्यारी? ही मस्करी का कुस्करी?

आनं०—मस्करी नव्हे—आणि कुस्करीही पण नव्हे! स्वारीचा जीव कीं प्राण ती प्यारी! अहो मजशीं हो कां चोरी?— अहो जिची मिठी बोली मोठ्या ऐटीनें बोलायची! फार तर काय जिच्या नांवावर देखील विकायचें! पण इथें—तिचें नांव छपवायचें! तें छपणार कसें बाई! (तरवारीला हात लावून) ही पहावी ती खुनी यवनी!—नांवाची समशेर! समशेरबहादुराची प्यारी!

राघो०—भले बहाद्दर! आमचा हा शिपाईबाणा पाहून—विनोदाची ही नवी टूम काढली वाटतें! धन्य कल्पना आमच्या लाडकीची (तिच्या गळ्यांत हात घालूं पहातो.)

**आनं०**—( झिडकारून ) पुरे ही लाडीगोडी ! त्या खुनी रांडेलाच घेऊन बसा—नव्हे फिरा मुल्कोमुलूक—खून करीत—

**राघो०**—( हंसत ) किती खुनशी आहेस ग तूं ! या दुर्गास्त्रावर देखील तुझें शस्त्र ! अग वेडे, इच्याच प्रसादानें तर हा द्विज—**राजराजेश्वर**—आणि तूंही पण—**राजराजेश्वरी** !

**आनं०**—गोष्ट खरी ! पण आमची ही सारी **राजराज्श्री** या **शनेश्वरमंदिराच्या** या चौकापुरतीच हो ! याच्या बाहेर चोहोंकडून **चक्रबंदी** ! !

**राघो०**—या शनवारच्या राजवाड्यास—या **आनंदभवनास** तूं, **शनेश्वरमंदिर** ह्मणतेस काय? अग, अशानें—मला **शनी** आणि तुला **साडेसाती** ह्मणतील लोक ! ( हंसतो )

**आनं०**—मरोत ते लोक ! हव्वें तें बकोत मेले !

**राघो०**—पण यांत दुर्लौकिक कोणाचा ?

**आनं०**—त्या **दुर्लोकांचाच**! अहो त्या मेल्या **दुतोंड्या लोकांच्या अपवादाला** भिऊन भिऊनच ना **आह्मीं सर्वस्व** घालवून बसलों ! तरी त्यांचा ह्मणून **ससेमिरा** आमच्या मागचा सुटत नाहींच ! ! तर अशा **पाजी** लोकांस—**यमलोकच** दाखविला पाहिजे ! ! !—तरच या **नरजन्मीं** आल्याचें **सार्थक्य** ! पण असें **महत्कृत्य** या **लोकभक्ताच्या** हातून कुठलें बाई घडायला ! **तर बाई**

आनंदी! तूंच हा **दुर्लोक** सोडून चल कशी चटकन्! ह्मणजे सर्व कटकटींतून सुटलीस तूं! मग मागें या **आनंदभवननामलाक्षागृहास आग** कां लावीनात ते **कौरव!**

**राघो०**—शिव शिव! मग मागें माझें तरी काय आहे ग? मग हा **त्वन्मुखचंद्रचकोर** क्षणभर तरी जगेल काय? अग अशा **आनंदी आनंदांत** अंतर पाडणाऱ्या कुरापती—भीति उकरून काढून व्यर्थ कांग भितेस तूं? कुठलें **लाक्षागृह** आणि कुठले कौरव निर्माण केलेस तूं! अग हा **पेशवाईचा गौरव—प्रत्यक्ष भैरवभरारी** विद्यमान असतां—ते **काल्पनिक कौरव** काय करूं शकणार तुला?

**आनं०**—( आपल्याशीं ) आनंदी, पुरे कर आतां! आज हा बार भरून ठेवलेला तुझ्या उपयोगीं फार पडेल पुढें! तर आतां या **"त्वन्मुखचंद्रचकोरास"** विन्मुख करूं नकोस. तर ऊठ—मार कडकडून मिठी न काय—( त्याच्या गळ्यांत हात घालून त्याच्याकडे प्रेमकटाक्षानें पहात ) ती सारी भीति या माझ्या **प्राणपतीस अपाय** होऊं नये ह्मणूनच! पण आपणास—**'आपण निर्भय आहों'**! असें वाटत असल्यास—मी तरी कशाला आपला सुखाचा जीव दुःखांत घालूं? या माझ्या प्राणेश्वराच्या—**राजराजेश्वराच्या** वामांकीं सदा विराजित होऊन—खरीखुरी अर्धांगी बनून—**आनंदी** नांवास **अन्वर्थक** करून, **आनंदी आ-**

नंदांत निमग्न होऊन जाईन. मग मेली ही इकडची दुनिया तिकडे कां होईना !

राघो०—( प्रेमातिशयानें तिजकडे पहात ) अहाहा हा ! या अपूर्व स्त्रीरत्नास उपमा ह्मणून नाहींच नाहीं ! ह्मणूनच असें वाटतें कीं:—सच्चिदानंदानें परमानंदास—परम रम्य जें रामारूप, तें देऊन ही आनंदमूर्ति आनंदी स्वहस्तें निर्माण केली असावी.

आनं०—पुरे पुरे ह्मटलें ही मतलबी—स्तुति ! मागितलें नाहीं कांहीं जंवर—तंवरच ही आनंदमूर्ति ! नाहीं तर—

राघो०—नाहीं तर काय ? तुझें मागणें आजवर कोणतें अमान्य केलें ग मीं ? हे प्राणेश्वरी ! फार तर काय—हे पंचप्राणही त्वत्कारणीं हजर आहेत !

आनं०—तर आजचें हें औदार्य अमर्याद ह्मणायचें ! (हंसून) ह्मणजे—फुकटची फुशारकी मिळवायला काय वेंचतें !

राघो०—कमाल आहे तुझ्या अंत पहाण्याची ! अग—अशा सौंदर्यचातुर्यखनीची मागणी कोण मानव अमान्य करूं शकेल ? चल आंत—तुला कांहीं आनंदाची वार्ता सांगायची आहे. ( ती त्याचा हात धरून आनंदानें निघून जाते )

( पडदा पडतो. )

---

# अंक तिसरा.

## प्रवेश १.

### स्थळ–तेंच.

### वेळ–संध्याकाळ.

(**आनंदीबाई** सचिंत बसली आहे.)

**आनं०**–(आपल्याशीं) शिव शिव! नको–नकोसा झाला आहे हा जीव! रात्रंदिवस मेली एकसारखी तळमळ!–पळभर देखील चित्त स्वस्थ नाहीं! ती **चिंता–चिते**ची वडील बहीण–हाडें फोडून मज्जा भक्षण करणारी **डाकीण**–लागली आहे माझ्या मागें हात धुवून! ती कुठली चैन पडूं द्यायला मला!–ती **पछाडणार** मला! (विचार केल्यासारखें करून) कोण हा माझा भेकडपणा–वेडेपणा! अग वेडे, त्या केवळ काल्पनिक डाकिणीचा तुजवर–**आनंदीवर** (हंसून)–या प्रत्यक्ष **महामायेवर** इतका **पगडा**! तर मग अशानें तुझ्या हातून तें **महत्कृत्य** कसें तडीस जाणार बाई! छत्! हा असला ढिलेपणा तुला शोभत नाहीं! अग, त्या काल्पनिक पिशाचीची कल्पना देखील मनांत आणूं नकोस! तूं आपल्या अपूर्व कल्पनांनीं ती **कल्पवल्ली** ह्मणजे **श्रीमंती**–अर्थात् **पेशवाई** प्राप्त केल्यावांचून ह्मणून राहूं नकोसच! (उपहासानें) आज **पेशवेसरकार**चा बडा **दर्बार** भरला अ-

सेल ! बडे बडे **अमीर उमराव-राव राजे विराजले** असतील तिथें ! "**हैदराव**र स्वारी करावी कीं नाहीं"- "करणेंच असेल तर-पावसाळ्याच्या आधीं कीं नंतर"- "त्या स्वारीबरोबर **श्रीमंतांची स्वारी** निघणार कीं नाहीं" या तीन गोष्टींची मसलत व्हायची आहे-त्या **साडेतीन शहाण्यां**च्या मजलशींत ! (आश्चर्ययुक्त मुद्रेनें) पण त्या मेल्या **मुत्सद्दी** ह्मणविणाऱ्या **गद्ध्यांना** इतकेंही कसें कळत नाहीं, कीं "**श्रीमंत** कुठें **लढाईंत** जाऊन लढतात-! **श्रीमंत** तर **रंगमहालीं-छपरपलंगीं रंग** करीत **पडतात** ! ह्मणूनच ते **श्रीमंत**-आणि त्यांची कृती-**श्रीमंती** ! हाय हाय ! काय या आयत्या पिठावर रेघा ! काय या आयत्या बिळीं नागोबा बळी ! कायरे **नारायणा**, खरेंच सांग-ही **श्रीमंती** मिळविली कुणीं ?- आणि राखली कुणीं ? आणि तूं रे कोण तिला एकटाच भोगणारा ? कां न भोगशील बाबा ! **भाग्याचा पुतळा** तूंच एक ! आणि तुझी **अर्धांगी गंगा** काय ती **सौभाग्यवती**! आणि आह्मी सगळ्या जणी-**गंगाभागीरथी**!!! (**राघोबादादा**स दुरून येतांना पाहून आपल्याशींच) आले आमचे **रणनवरे** धडाधड पाय आपटीत ! (तोंडाकडे पाहून) आज **राजश्रींची नाचक्की** झाली असावीशी दिसते-व्हायचीच ती ! **बंदिवानाचें** ऐकतो कोण ? वाहवा ! स्वारी खूबच संतापली आहे ! तर ही संधी-आपला डाव साधायला-

तो–भरून ठेवलेला **बार** उडवायला–फार नामी आहे ! न वळणारें असें कठीण लोखंड देखील तापलें ह्मणजे हव्वें तस्सें वठणीस येतें !–मग, हें तर रक्तामांसाचें माणूस–कां न वळेल ? (राघोबाशीं) काय बाई नवल तरी हें ! आटपला का तो **जंगी** का **चंगी दर्बार** इतक्यांत ! आणि गेले का ते मेले–**लुंगे सर्दार** ?

**राघो०**–(दांत ओंठ खात) जळो तो दर्बार ! मरोत ते सर्दार ! पुरे तो रिकामा कारभार ! (दीर्घ श्वास सोडतो.)

**आनं०**–पण असा जिवाचा संताप करून घ्यायला कारण तरी काय झालें मेलें ? ऐकलें नाहीं वाटतें कुणीं आपलें ?

**राघो०**–जेथें तमाम **बदमाष–दगाबाज–पाजी**–तेथें या **गाजीचें** ऐकणार कोण ?

**आनं०**–पण बाई आपलें त्यांचें मतांतर तरी झालें कशांत ?

**राघो०**–अग, कशांत काय विचारतेस ? सारेंच **मतांतर** ! आह्मीं ह्मटलें:–**हैदरावर** स्वारी करणें ती आतांच करावी. दुष्मनाला फाजील सवलत देणें वाजवी नाहीं. बर्सातीबाद तो गुलाम हरीफ होऊन बसेल; दाद द्यायचा नाहीं. शिवाय या जंगी **स्वारी**बरोबर **खुद्द पेशवे**ही आले पाहिजेत. अशा वयांत असे युद्धप्रसंग अवश्य अनुभवले पाहिजेत. या राजमान्य मतास ते **'मतलबके यार'** कोणीही सम्मत झाले नाहींत !

**आनं०**—बरोबर आहे! ते मेले मतलबी—**श्रीमंतांचे** बोल झेलणारे—**चोमडे;**—**श्रीमंतांस** प्रिय असेंच बोलणार!

**राघो०**—केवळ इतकेंच नाहीं—त्या **तात्या फडक्यानें** आपल्या सडकेपणाची हद्द करून सोडली!—काय ह्मणतो बेटा:—(वेडावून) "आतांच स्वारी करणें जर आपणास युक्त वाटत असेल, तर बेलाशक आपण व आपले कलेजे मिळून करावीच! आपणांसारखे [अश्वत्थामा] **महारथी**—व बापूंसारखे पुरे मसलती—[शकुनीमामा] **सारथी** युद्धांत सिद्ध असल्यावर, **विजयश्री** ह्मणजे आपली **बंदी**—मग त्या **हैंदऱ्या हैदराचा** पाड किती!" 'अश्वत्थामा' आणि 'शकुनीमामा' हे शब्द तो पाजी अशा शिताबीनें बोलून गेला, कीं कुणीं ऐकले न ऐकले—कुणाला कळले न कळले—पण मला ते वाग्बाण—मर्मी लागले! तें ऐकतांच ते सारे हरामखोर लागले 'हि हि हि' करायला! त्यांतही विशेष—आपला **नारायण**ही लागला दांत काढायला!

**आनं०**—तें दांत काढणें नव्हे!—हे—आपले दांत पाडणें होय तें! तो आपला का **नारायण** राहिला आहे आतां? त्यानेंच हो त्यानें—मुद्दाम तो दर्बार भरवून—भरदर्बारीं आपली आबरू घेतलीन, हें नाहीं का लक्षांत आलें अजूनही आपल्या? बरें, मग पुढें?

**राघो०**—पुढें काय? त्या **फडक्याला** चांगले खड-

कावून—आणि त्या गधड्या **कारभाऱ्यांची** खूब खरड का-ढून आलों निघून—झालें!

**आनं०**—फार चांगलें केलेंत ! पण मी विचारतें—त्या स्वारीवांचून आपलें काय अडलें होतें हो ? त्या **रण-दीपावर** बळेंच झडप घालून, जळून मरण्याची कोण मेली वेडी हौस ही !

**राघो०**—अग वेडे, असले कैक **रणदीप** टाकलेत मालवून, या **राघो भरारीनें**, आपल्या भरारीनें बरें का !

**आनं०**—पण त्या—पोपटी भरारीचा नेटका उपयोग, तितकाच बरें का !

**राघो०**—काय ह्मटलेंस ? **पोपटी भरारी** ! अग—हा **राघवभरारी** ह्मणजे **पक्षींद्र**—अर्थात् **यवनसर्पारि** होय! समजलीस ?

**आनं०**—होय समजलें—अर्थ उत्तानच आहे ! पण आपण जरी **पक्षींद्र** असलांत तरी—त्या **श्रीमन्माधवना-रायण** यांस वाहनस्थानापन्न—**गरुडच** होत आलांत ना?

**राघो०**—( रागावल्यासारखें करून ) शर्थ झाली तुझ्या श्ले-षार्थाची ! शास्त्र्याचीच बेटी तूं—या शस्त्रधाऱ्यास कुठली बोलूं द्यायला!

**आनं०**—( किंचित हंसून ) अस्सें काय ? आला वाटतें राग ! तो यायचाच इथें ! वज्याचें तेल वांग्यावर निघा-यचेंच तें ! पण मी पुन्हा हात जोडून ह्मणतें, कीं अंमळ

विचार करून पहावें:-इतक्या लढाया मारून, संसार-सुखास दूर झुगारून, सर्व जगास आपल्या अपूर्व शौर्य-वीर्यानें थक्क करून, शेवटीं मिळविलें तें काय हो आपण ?-सदा प्रतिबंधवासच ना ? शिव शिव ! कोण वेडेपणा बाई हा ! अहो, त्या कैलासवासी का मसणवासी माधवाची, आणि या विलासी नारायणाचीच भर केलीत ना आपण? राजधुरी धारण केलीत आपण-पण ते राजश्री राज्य हाकणारे बनले. अहो जसें-अश्वादि वाहनांकडून युद्धांमध्यें भार वाहवून-नंतर त्यांस बांधून ठेवितात,-तसेंच हो तस्सेंच-आपणांकडूनही शत्रुसंहार करवून घेऊन, आपणांसही प्रतिबंधांत ठेवीत आले ते !

**राघो०**-अगदीं खरें !-त्या गुलामानें माधवानें तस्सें केलें होतें खरेंच !

**आनं०**-काय त्या माधवानें गुलामानेंच तस्सें केलें होतें ? आणि हा नारायण काफर का कमी करीत आहे ? हरहर, या भोळेपणास उपमा आहे काय ? अहो आपण आतां--नजरबंदींत आहांत ह्मटलें !

**राघो०**-(हातपाय आपटीत व दांत ओंठ खात) काय-काय ह्मटलेंस ? मी-मी नजरबंदींत आहें ?

**आनं०**-होय होय-आपण आपण-आपल्या या अभागिनी अर्धांगीसुद्धां-नजरबंदींत-कैदेंत आहांत ह्मटलें !

**राघो०**–( करकरां दांत चावून )कोणा नीचाच्या हुकुमानें?

**आनं०**–नीचाच्या नव्हे–त्या **सर्वोच्चाच्या**–आमच्या **काळजाच्या घडाच्या–श्रीमन्नारायणरावसाहेब पेशवे बहाद्दराच्या**–

**राघो०**–हुकुमानें आणि आह्मी **नजरबंद–कैदी** ? पण इथें–कुठें–कुणी हरामखोर–चोर कसे दिसत नाहींत ?

**आनं०**–असें उघड दिसल्यावर मग ती **नजरबंदी** कसली ? इलाच ह्मणतात **चलाखी** !

**राघो०**–शिव शिव ! नारायणा, काय रे तुझें हें अघोर कर्म ? अरे कृतघ्ना ! ज्यानें आपल्या तोंडचा घांस चारून, तुला लहानाचें थोर केलें–आणि **इहलोकींचें इंद्रपद** तुझ्या स्वाधीन केलें, त्या तुझ्या **काकावर**–तूं–त्याच **पदाच्या जोरावर–चोरपाळत** ठेवलीस अँ? खासे उपकार फेडलेस रे बापा !

**आनं०**–अहो! सापाची करणी अशीच असायची !–त्याच्या दुर्मुखांत दुधाचेंही **विष** व्हायचेंच !–तर अशा **विषारी** सापास **"बाप"**–ह्मणण्यापेक्षां, त्याचे ते **विषारी** दांत साफ पाडून, त्याला **निर्विष** करून टाकलेलें बरें !

**राघो०**–अगदीं खरें ! पण काय ग ? खरें ह्मटलें असतां त्या **अल्लड** पोराकडे काय आहे ? ते हरामखोर–कारभारी करतील तें होतें आहे नाहीं बरें?

**आनं०**—पण तें हरामखोर **पोर** लहान का आहे आतां ? अशीं **अघोर** कर्में करायला—हव्वे तसले हुकूम द्यायला ? अहो तें पोर नव्हे—तें सर्वानर्थांचें मूळ होय ! आमच्या **मुळावर,** आला आहे तो **कुळबुडव्या कारटा !**

**राघो०**—हाय हाय! काय हा **दुर्जनसंगतिप्रमाद** ! खरें ह्मणत होतीस तूं—नित्य आमच्या कानींकपाळीं ओरडून ओरडून, कीं "पहा हो, तें **पोर** बिघडत चाललें आहे! संभाळा! कोण्या वेळीं कोणावर घाला घालील हें कळणार देखील नाहीं."—तें लगेच—आलेंच अनुभवाला! पण करावें काय ?—आपलेच दांत आणि आपलेच ओंठ पडले ! कमज्यास्त का करतां येतें? त्या चांडाळ **नाना**चा सहवास सुटल्याशिवाय **नारायण** कांहीं ताळ्यावर येणार नाहीं. तर दाखवूं का त्या **लंबग्रीवाला** हात ?

**आनं०**—छे छे—भलतेंच आपलें कांहीं तरी ! अहो **नाना**ला आणि उघडपणें हात दाखवायला जाल तर—आपल्या पायांत बरीक अडकावून घ्याल ! त्या **लफंग्या लंबग्रीवास** युक्तीनेंच **लंबा** केला पाहिजे ह्मटलें—

**राघो०**—पण काय ग—ही बातमी **बापूंनीं** कशी नाहीं कळविली आह्माला ? त्यांना ती कळली असेल नाहीं बरें?

**आनं०**—यांतहो काय संशय! त्या **सगळ्या शहाण्याच्या** कांद्याला काय कळत नाहीं? पण अशी **राजकीय**

बातमी—आणि आपणांसारख्या **नजरबंद कैद्यास**—जर तो **दीडशहाणा** कळवील, तर—त्या **साडेतीन शहाण्यांत** कसा मोडला जाईल तो ? गोडबोल्या सालसोल्या मेला—त्या चांडाळचौकडीचा **चौधरी** तो !—त्याला आह्मी आपल्या मसलती कळवीत गेलों—ह्मणूनच फसत गेलों ! ह्मणून ह्मणतें—आजपासून तरी सावध होऊन राहावें—आपलें **गुप्त** ह्मणून सहसा कुण्णा कुण्णापाशीं देखील प्रकट करूं नये. ह्मणजे **कार्यसिद्धीस** उशीर काय ?

**राघो०**—अहाहाहा ! काय हे स्त्रीबुद्धीचे तारे तुटले ! वेडी कुठली ! सखाराम बापूसारख्या आमच्या सच्या दोस्ताबद्दल—आणि भलतीच शंका ? ह्मणजे याला ह्मणावें काय ? अहो आनंदीमहाराज, हें आपलेंच **गुप्त पिशाच**—भोंवताहे आह्माला ! तें—औरंगाबादच्या सुभ्याशीं धोरण—राजकारण—कारण झालें असावें आमच्या या **नजरबंदीस** ! आमच्या बापूंलाग कां उगीच टोमणा ?

**आनं०**—खरें आहे ! पण आमच्या बापूंनींच मारली ती बोंब ना ? नाहीं तर—ती **गुप्त** मसलत फुटली असती कशी ?

**राघो०**—"फुटली असती कशी" ? अनुमानानेंच का साप साप ह्मणून भुई बडवायची ? अग त्या **खंबीर** मंत्र्याचे ब्रिलंदर **बीर**—फिरताहेत ना आमच्या पाळतीवर !

**आनं०**—पण तो आपला सखाराम **पीर**—पडला न-

सता मधीं—तर त्या बीरांस मारून, त्या खंबीर मंत्र्यास टाकला असता गाडून कधींच (छातीस हात लावून)—या ऐंद्रजालिकीनें !

राघो०—(साश्चर्य) काय ह्मणतां ! तर राहिला तो सखाराम! आपणच आपलें काम साधा पाहूं ! पण प्रिये आनंदी! मी ह्मणतों त्या मसलती वासलतींतच जर आह्मीं पडलों नाहीं, तर आमच्या वाटेस कोण जाईल बरें ? नारायण तर आपलें बाळ——

आनं०—खरेंच तें! अगदीच कुकुबाळ ! ह्मणूनच तें या काकू—काकाच्या जिवाला काळ होऊन बसलें आहे! आमची वाट तर कंटकांनीं—कांट्यांनीं गच्च भरून गेली आहे ! त्या वाटेस जाईल कोण ? ती दुर्गम वाट आह्मा दुर्दैव्यांच्याच वांट्यास आली आहे !

राघो०—(आपल्याशीं) इचें ह्मणणें तरी कसें खोटें ह्मणावें? खरें ह्मटलें असतां, हीच या पेशवाईची स्वामिनी ! इजवर चोरपाळत—नजरबंदी ह्मणजे बेबंदी नव्हे काय? छे छे ! त्या चांडाळचौकडीनें प्रळय केला खरा! एका सखाराम बापूचाच काय तो आह्माला भरंवसा होता; पण ज्या अर्थी—आमच्या घरच्या सर्व मसलती फुटूं लागल्या, त्या अर्थी—त्याजवर तरी कसा विश्वास ठेवावा ? ही माझी प्राणेश्वरी—तरी माझ्याच सुखासाठीं रात्रंदिवस तळमळते खपते आहे ना ? तर इच्या इच्छेप्रमाणें कां होईना. बरें

ही काय काय करूं ह्मणते तें तरी पाहूं या. (उघड) तर आतां—अशा आणीबाणीच्या प्रसंगीं कसें करावें ह्मणतां आपण ?

**आनं०**—जर आपण—माझी एकच विनंती मान्य कराल, तर अशी **अलौकिक** करणी करून दाखवितें, कीं सर्व दुनया थक्क होऊन जावी.

**राघो०**—पण ती विनंती सयुक्तिक असेल तर—

**आनं०**—तर ती सयुक्तिक असून—वर सहज आहे—ती हीच कीं:— आपण एक आठवडा स्वस्थ बसावें—"कस्सें"—"काय" ह्मणून कांहीं एक विचारूं पुसूं नये ! मग पहावा या **आनंदीचा प्रताप** ! ! !

**राघो०**—पण "**स्त्रीबुद्धिःप्रलयंगता**" असें न व्हावें. नाहीं तर मग—"**आनंदीचा उदे उदे**"— आणि या—"**राघोबाचा—येळकोटभे**" होण्यास वेळ काय ?

**आनं०**—"उदे उदेची" भीति नको—"येळकोटभे" चें भय नको—आपल्या "**वैऱ्यांचा चांगभले**" करून—"**नाऱ्याची तळी**" कशी उचलतें—तें पहात राहावें ह्मटलें !

**राघो०**—भले बहाद्दर! पण तुह्मी **राव**, काय काय करणार तें कळलें पाहिजे आधीं—आह्माला हो—(हंसतो).

**आनं०**—तें आपणास तर कळेलच—पण काम **रंगास** आल्यावर हो.

**राघो०**–पण आधीं कळविलेंस, तर का मी फोडीन तुझी मसलत ?

**आनं०**–माझीहो कसची मसलत ?–आपलीच ती ! ह्मणूनच आधीं विनंती केली मीं–कीं एक आठवडा "कांहीं एक विचारूं पुसूं नये" ह्मणून ! आपण **रणधीर** ना ? एक आठवडा–सातवडाच ह्मणायचा–सात दिवस आणि सातच रात्री–धीर नाहीं निवत का ?

**राघो०**–बरें–आहे ! आबरू संभाळून काय तें करा ! नाहीं तर पहा–

**आनं०**–राहिलेली संभाळून–सर्व जगत् चकित् करून सोडतें, पहात रहा !

**राघो०**–ठीक आहे–हव्वा तो गोंधळ घाला–एक आठवडाभर ! त्यानंतर बोलूं द्यायचा नाहीं मी हो ! सांगून ठेवतों आधींच !

**आनं०**–पण बोलायला जागा राहील तर बोलाल ना ? तोपर्यंत सर्व सत्ता आपल्या हातीं !–आपल्या पायांवर लोळण घालणार सर्व लोक !

**राघो०**–( तिची पाठ थोपटून ) शाबास मेरे बहाद्दर ! तर चिंता नाहीं !

**आनं०**–ती मेली चिंता गेली चितेंत ! ! चला–आपण आजपासून निश्चिंत झालों ! ! ! ( त्याचा हात धरून मोठ्या डौलानें जाते. )

# अंक तिसरा.

## प्रवेश २.

स्थळ—तेंच.

वेळ—प्रहर रात्र.

( **आनंदीबाई** लोडाशीं टेंकून गादीवर बसली आहे—व **गजी** कांहीं अंतरावर गालिच्यावर बसली आहे. )

**आनं०**—अग पण मी विचारितें—तूं काय ह्मणून गेली होतीस तिथें ! आपला असा अपमान करून घ्यायला ?

**गजी**—अजी पन—तिथ्थं, गेल्या—आल्याबिगर भागत-या कुठ्ठं? तीं मेलीं खेळीं—काय काय खेळ करत्यात—ते नको का पाह्याला ? येळ है—वखत है—समद कळलेलॅ सवरलेलॅ असावॅ. तशामंदी कालचा थाटमाट—तर अक्षी बघन्या-जोगा व्हता! जनू इंदरभुवन उतरलॅ व्हतॅ या मिर्तलोकीं!

**आनं०**—ह्मणजे ग काय ?

**गजी**—ह्मंजी काय मून जी काय इचारता ? ती वार्ता बी नाहीं का आली आपल्या कानावरती अजून ?—अजी त्यो मेला डोला का हिंडोला—लस्कराहून पाटीलबुवांनीं दिलेला धाडून—नाहीं का आपून पाहिला ?

**आनं०**—तो—तो जयपुरी झोपाळाना ?—बरें मग—त्याचें काय ?

**गजी**—त्याचाच सोळा झाला काल—झुलण्याचा स-

मारंभ झाला ह्मतलॅ! म्हून मी मुद्दाम बघायला गेलें व्हते जी!

**आनं०**—झुलण्याचा समारंभ!—असे **समारंभ**—तरी किती करणार ती **गंगी बहुरंगी** ?—पण असें पहाण्याजोगें मेलें काय ग होतें त्यांत ?

**गजी**—अजी ती मज्जा पुसूच नका—अन् मह्लावी ती सांगतां यायची नाहींच—

**आनं०**—पण तें सांगितलेंच पाहिजे ह्मटलें—

**गजी**—(हंसत) काय सांगूं बाई!—असा अजब **झोपाळा** आपल्या बापजल्मीं पाहिला नव्हता! त्यो कशाचा केलाया हेबी कळेना! रुप्याचा ह्मनावा—तर समदॅ सोनच चकाकतया! सोन्याच्या ह्मनावा तर—सारॅ हिरे मानीक मोतीच चमकत्याती!—अक्षी चक चक लक लक बघा!—डोळॅ मंजी दिपून गेलॅ—त्या सूर्यावानी झकाकीर्नं! अन् अशा वरती—जरतारी गादी तक्के—मखमलीर्नं मढलेलॅ—अन् परांनीं भरलेलॅ!—अस्सॅ नरम नरम—मऊ मऊ की हात लावताच अक्षी गुदगुल्या व्हत्यात! मंग त्याजवर बसनारांला अन् निजनारांला किती किती अन् कशी कशी मौज—मज्जा वाटत अस्सॅल ती त्यांच्याच जिवाला खबर! सर्गी तरी मेल असलॅ कुठलॅ जी सुःख! "याच देहीं याच डोळां—पाहिन सर्गीचा सोहाळा" ह्मनत्यात त्यो ह्योच! अन् अशा वरती आनखी मोत्याच्या झालरी!—काय फ-

डकत व्हत्या व्हंता!–अन् मार त्या पंचरंगी रेसमाच्या क-
लाबतूनँ लपेटलेल्या काढन्या!–त्या रुप्याच्या कड्या मंदी
अडकवलेल्या किती खुलत व्हत्या! अन त्या वरती–हस्ती-
दंती नक्षीचे छत काय दिसत व्हतँ बघा!!! अशा हिंडो-
ळ्यावर–**गंगाबाईसाब**–भरजरीचा बुट्टेदार शालू अक्षी
चुस्त नेसून, अन् मार अंगीं तंग तटतटित जरीची पट्टेदार
चोळी घालून, अंगावर सारँ हिऱ्या मोत्यांचँ अळंकार लेऊन–
सोळा सिनगार केलेल्या सोळाजनी संवगडनी–चहूं बाजूला
चौचौजनी झुलवायला उभ्या करून, जव्वा का **झुलत्या
परी**वानी लागल्या झुलायला! तव्वाची सोभा काय सांगूं
**बाईसाब**! त्यांच्या पुढं कनई–**इंद्रायनी** बी **इद्री** दिसली
असती–अन् **मदनाची रती** तर **रत्ती**भर बी तुलली न-
सती त्यांच्याशीं–मंग इतर नारी तर त्यांच्या पासंगालाबी—

**आनं०**–(दरडावून) पुरे कर तुझी वटवट! भाटासारखी
बडबड करावी किती मेली! अगँ हे किनई–सारे **श्रीमं-
तीचे** चोचले! पूर्वींची ती हीच **गंगी** ना? थेट **कैका-
डणी** सारखी नव्हती का दिसत?

**गर्जी**–(आपल्याशीं) अस्सँ–अस्सँ–! गंगाबाईची अन्
बडाई कुठली खप्पायला आनंदीबाईला! पन मला बी तरी
तेंच व्हावँ (उघड) पन मी बी तरी तेंच व्हंतेना–काय ह्यो
शिरमंतीचा महिमा! माकडाचँ मानूस कसँ बनवितोया!

**आनं०**–बरें पुढें काय झालें?

गजी–तेंच तर सांगतेंया! त्यो थाटमाट पहात मी एक्या कोपऱ्यामंदी आपली गुपचुप उभी व्हते! तिकडॅ त्या मळकट तोंडाच्या अन् कळकट वानाच्या बजीची गेलीं नजर! अन् ह्यंगाली काय मॅली–"येऊनशनी पोचल-का मंथराबाई तुह्मी इथॅ बी?–निवलॅ का तुमचॅ डोळॅ"?

आनं०–'मंथरा' का ह्मटलें त्या रांडेनें तुला? तर मला ग काय ह्मणणार त्या चांडाळणी?

गजी–केगामतीच ह्मननार! दुसरॅ काय ह्मनत्यात?

आनं०–अग रांडांनो! त्या केगामतीनें रामालाच नुस्ता वनवास दिला होता–पण ही केगामतीची अक्काबाई–तुमचा–सर्वांचा सत्यानास करील–तेव्हांच स्वस्थ होईल! असो. मग तूं काय जबाब दिलास त्या घुबडतोंडीला?

गजी–जाब पन जाबच दिला! अक्षी चुरचुरीत सवाला जोगा! ह्मतलॅ–असलॅ हिंडोळॅ पाहून का मंथरेचे डोळॅ निवत्यात? ते निवायला, ते डोळॅ येगळॅच–भाईर सिरवायाचे!

आनं०–शाबास! याचें नांव शेरास सव्वाशेर! हें ऐकलें का त्या झुलत्या परीनें?

गजी–त्या इंद्रायनी आपल्या झुलन्याचॅ तोऱ्यांत गरक! त्या कुठल्या कान द्यायला आमच्या बटकुरांच्या वटक्याकडॅ? पन ती बजी मातर मनांत चरकली–पन करतीया काय! बसली चुरमुरॅ खात!

**आनं०**—तर आतां तो डोला तूं कधीं मिरविणार?—तो जमादार आज येणार ना?

**गजी**—जमादार नाहीं—त्याची ज्यावर समदी मदार त्यो येनार!

**आनं०**—तो मुसलमान?

**गजी**—व्हय, त्यो पठान!

**आनं०**—शिव शिव! यवनाशीं आणि **आह्मीं** मसलती करायच्या?

**गजी**—यवनाशींच काय—मांगाला दिखील मामा ह्मतलॅ पाहिजेल ह्मतलॅ आपल्या कामासाठीं! आपून का आतां भटबिऱ्हामन हात? नव्हॅ **राजॅलोक**! **इष्णुचा आऊंस**!

**आनं०**—तें खरेंग—पण "**मुसलमान**" "**मांग**" यांच्याशीं बोलायचें **आह्मीं**—ह्मणजे कसेंसेंच वाटतें ग—पण करायचें काय—नाउपाय झाला आहे! **रामोशांशीं** प्रसंग पडल्यामुळें आह्मालाही अशा ढंगांत शिरणें भाग पडताहे! बरें तर जा—तो आल्याबरोबर कळीव मला—

**गजी**—आज्ञा—येतें. (जाते.)

---

# अंक तिसरा.

## प्रवेश ३.

स्थळ—सखारामबापूचा वाडा.

वेळ—मध्यरात्र.

(...ारामबापू आणि रामशास्त्री हे लोडाजवळ बसले आहेत.)

...—शिव शिव ! अशा अघोर पातकांस—**ब्रह्मह-**
...**राजद्रोहास**—हा **सखाराम** साह्य झाला काय ? तर मग या **कुलकलंकानें** आपल्या **राजमान्य—राजनिष्ठ बोकील घराण्यास कालिमा** लावला ह्मणायचा! शास्त्री-...वा, हा निराधार पण फारच भयंकर आरोप मजवर आणला कोणीं—हें स्पष्ट सांगावें !

**राम०**—बापू, "जन त्रिविध आहे" हें तत्व आपणांस माहीत आहेच !—आपण त्या **अपवादापासून अलिप्त** असलां ह्मणजे झालें ! **सत्य** आहे तें—प्रत्ययास यायाचेंच !

**सखा०**—पण आपला " **जन** " हा शब्द येथें—त्या **जनार्दनाच्या** गुणी बाळास—अर्थात् **बाळाजीसच** लागू आहे—असें हा **जन बेलाशक** ह्मणतो ! त्या **दुर्जनावां**-चून—या **जनावर** आणि अशी **तोहमत** घालणारा **जन** या **जगांत** दुसरा नाहींच ! ह्मणूनच ह्मणतों—त्या अर्धशहाण्या **नानाचा** आणि माझा साम्ना करवून आपणच न्याय करा ह्मणजे झालें—मी दोषी ठरलों तर—हा देह

ठेवणार नाहीं! नाहीं तर मला दोष लावणाऱ्याच्या नरडी-चा घोट घेईन, ह्मटलें घोट!

**राम०**—वाहवा! हें तर मग आपलें अलोट—**सगळें** शहाणपण ह्मणायचें, दुसरें काय!

**सखा०**—दुसरें काय असणार—हें सर्व त्या **चित्तपावनीचें पावनचरित्र**! पहा ना याच **नानाच्या कोकणस्थी**—कारकिर्दीत **देशस्थीं**ची काय दुर्दशा झाली ती!—**पुरंदरे** धुळीस मिळाले! **पितांबरे** सांधींत पडले!—पण **रास्ते** रस्तोरस्तीं मिरवूं लागले! आणि **फडके** जिकडे तिकडे फडकूं लागले!!!

**राम०**—( किंचित् हंसून )वा:! कोकणस्थींचा उत्तम पोवाडा गायलात आपण! पण मी आपल्या अनुभवावरून ह्मणतों—कीं आपली करणी खोटसाळ नसली तर **देशस्थी** कांहीं **कोकणस्थी पेशवाईस** वर्ज्य नाहीं! अहो, आपण उभयतां—**नाना बापू** या पेशवाईचें **भूषण** आहांत! एकमेकास दूषण देण्याच्या ऐवजीं—आपण दोघेजण एक व्हाल—अर्थात् एकचित्तानें वागाल तर या **ब्राह्मणशाहीस**—**पेशवाईस चिरस्थायी** कराल किं हो?

**सखा०**—पण येथें कोणाची ना आहे? पण त्या **कारस्थानी नानास** " एका म्यानांत दोन तरवारी " नको आहेत"—ना? ह्मणूनच हे आरोप!!!

**राम०**—पण बापू! मी थोडें बोलतों—राग तर येणार नाहीं ना आपणांस?

**सखा०**—आपला आणि राग ? ज्याला येईल तो म-
नुष्य नव्हे—पशूच !

**राम०**—आपणांवर पूर्वी कैलासवासी माधवराव साहे-
बांच्या वेळीं—राज्यांत कांहीं ढवळाढवळ केल्याचा दोष
सिद्ध झाल्यावरून, [खुद्द आपल्याच हातच्या चिठ्ठीवरून]
आपणांस कारभार सोडून घरीं बसावें लागलें होतें हें
खरें ना ?

**सखा०**—पण तें सर्व करणें दादासाहेबांच्या हिता-
पुरतेंच होतें.

**राम०**—होय—आतांही पण दादासाहेबांच्याच हितार्थ
आपण राजक्रांति करूं पहातां असा जनापवाद आप-
णांवर आहे ! राजक्रांतीच्या पोटीं राजद्रोहादि
कोटी निपजायच्याच ! ! !

**सखा०**—पण हा सखाराम त्यापासून अगदींच ना-
मानिराळा आहे.

ह्मटलं !०—तर ते विषप्रयोग—जारणमारण—औरंगा-
रा॰ सुभ्याशीं धोरण—हीं कोणीं चालविलीं होतीं बरें ?

येतों—ग्रा०—हें मला हो काय माहीत ?

समा०—पण आपल्या संमतीविना दादा कोणतीही
करीत नाहींत हें खरें ना ?

खा०—असेंच असेल तर मग त्या कृति दादाकृत
!

**राम०**—बापू, अजूनही आपण निर्मलमनानें मजशीं बोलत नाहीं ! 'असेल' 'नसेल' असें उडाणटप्पू भाषण करायचें असेल तर बोलतां तरी कशाला ? निदान—मी **देशस्थ** आहें हें **लक्षांत** आणून तरी आपण मजजवळ खरी खरी हकीकत सांगावी ह्मणतों !—कोणतीही गोष्ट मला कळविल्यामुळें आपणांस पश्चात्तापास कारण होणार नाहीं.

**सखा०**—हें मी पक्कें समजून आहें. पण आपले कान त्या **धूर्तानें** भरले असल्यामुळें—आपणांस माझें भाषण खरें वाटत नाहीं—यास माझा नाइलाज आहे ! नाहींपेक्षां—आपणांसारख्या **क्षीरनीरन्यायनिर्णायकास** मजबद्दल असे संशय—मुळींच आले नसते ! !—त्या **जारणमारण—विषप्रयोगादि** खटपटींत आणि हा आपला **सखाराम** सामील होईल काय ? शिव शिव ! मी तर काय पण **दादा साहेबांच्या** हातून देखील अशी **नीच कृति** होणें नाहीं—हें मी खात्रीनें सांगतों !

**राम०**—येथें मात्र आपण चुकतां !—अहो, द[illegible] डले शुद्ध **बुधग्रह**—आणि त्यांची गृहिणी—पडल[illegible] **साडेसाती** ! तेव्हां—तिच्या कृतीस त्यांची अनु[illegible] सायचीच ! कारण त्या **भानुमतीपुढें दादांची** म[illegible] ठित व्हायचीच ! ह्मणून ह्मणतों—आपण जर द[illegible] घरच वर्ज्य केलेंत तर नाहीं का चालणार ?

**सखा०**—माझें चालेल—पण त्या **भानुमतीच्या**

प्रयोगास अधिक संवलत दिल्यासारखें होईल ! माझें तेथें जाणें येणें—सलगीचें असल्यामुळें—तिच्या अचाटकृति मला सहज कळत असत—व त्यामुळेंच त्यांजवर प्रतिकृति करायास मला सांपडत असे !

राम०—( किंचित् हंसून ) पण आतां तिच्या अचाटकृति—तिचे फंदफितूर सारेच बंद पडले ! कारण प्रस्तुत ती नजरबंदींत आहे—करणार काय ?

सखा०—असा बंदोबस्त असेल तर—मग मी दादासाहेबांचें दर्शन देखील वर्ज्य करतों.—

राम०—तर मग साराच वाद मिटला—लोकापवाद टळला ! ही शुभवार्ता नानांच्या कानांवर आतांच घालतों जाऊन ! आणि उद्यांच्या उद्यांच आपणां उभयतां मुत्सद्यांचा मिलाफ करून टाकतों—'शुभस्य शीघ्रं' !

सखा०—( हंसून ) आपण जें कराल त्यास मी राजी आहें ! पण नानाशीं आहे गांठ ! हें लक्षांत असूं द्यावें ह्मटलें !

राम०—आपण आपलें मन निर्मल ठेवा—ह्मणजे झालें. येतों—नमस्कार !

सखा०—( उठून—लवून ) यावें नमस्कार !

( पडदा पडतो. )

———

# अंक चवथा.

## प्रवेश १.

स्थळ—शनवारच्या वाड्यांतील एक खोली.

वेळ—प्रात:काळ—

( **आनंदीबाई** बसली आहे आणि **गजी** उभी आहे. )

**गजी**—का बाईसाब ! कस्सी है या **गजीची** पारख ? यवन मसलतींत नको म्हून—म्हनत व्हता ना आपून ?—पन कस्सा है त्यो भाद्दर यवन ?

**आनं०**—धन्य तुझी पारख ! तुझा तो यवन—दुसरा **कालयवन** म्हणायचा ! पण किती ग मेला **भेसूर** ?

**गजी**—अजी जो **सूर**—त्यो **भेसूर** असायचाच !

**आनं०**—पण त्याचें भाषण बरीक भारी मिठें! मीं आपलें कांहीं सहज विचारलें त्याला—त्याचें उत्तर त्यानें काय छान दिलें म्हणतीस ! जणूं ऐकतच रहावें ! आधीं **हिंदुस्थानी बोली** पडली **मिठ्ठी**—तशांत तो **मिठ्ठा ठग**—

**गजी**—अन् तशामंदी—आपलँ **साखर पसरनॅ**—मंग—कुन्नाची बाई—**मिठ्ठी** बसायची न्हाई ! (हंसते.)—पन त्याची बोली कळतिया ना आपल्याला ?

**आनं०**—हेंग काय विचारतेस ! **कारभारच** पहातें—कळणार नाहीं कशी ? पण बोलतां मात्र येत नाहीं मेली ! तुला बोलतां येते—पण शुद्ध उच्चार करितां येत नाहीं.

ा—पन काम तर चालिवतां येतय ना ? झालँ—
काम ! असो. चेला तर पसंत पडला ! गुरु-
च्च ! पन बाई, तें दोघँ बी पडलँ परकँ—पर-
:—अन् परदेसचँ. आपल्या घरचा कुनी इमानी
यांच्या मंदी असला तर—जनू दुधांत साकर !—
काई कमज्यादा होऊ द्यायचा न्हाई.

ा०—अस्सा माणूस—आणि आमच्या घरचा ?—
कुठून ?

ा—अजी लाखामंदीं—एकबी का गावनार न्हाई ?
का मेलँ बेईमान ? अत्तां बघा कस्सी नड पड-
त्या जमादाराला हटकायला जायाला है कोन् ?
या गजीनँ जावँ—जिथ्थँ तिथ्थ गजीनँच मरावँ—पन
टीनँ—काय काय म्हून करावँ जी ? त्यांत मी
यको मानूस—तशामंदी समद्यांच्या वळखी पाळ-
त्तीं बिरातीं,—जातां येतां,—पहारेकरी कुन्नी तरी,—
—खवरत्यात—अन् काईबाई कुजबुजत्यात झतलँ !

०—तुझेंही खरें आहे—पण गजाऊ ! असा प्र-
ा मेल्यावर विश्वास ठेवावा ग ?

—अजी, या गजीवर इस्वास ठिवूनशनी—आपून
ावँ !—ही आपली बटीक—सुतानें सरग गाठनारी
ाढतिया हुडकून एक परानी कीं बघत राहवँ !
र—तुळाजी ! येतोय्‌का ध्येनास ? त्यो पठ्ठा बघा—

दिसायला छोट्टा—पन हियाचा मोठ्ठा—अश्शी उलट्या काळजाचा—चित्यागत तुटून पडायचा—वैऱ्याच्या मानगुटावर !

**आनं०**—अग वेडी तर नाहीं झालीस? तो तर **हुजूरच्या मर्जीं**तला हुजूरनाईक !

**गजी**—( हंसत. ) पन या गजीचा जिव्हाळा ! इच्या जिवाला जीव देनारा !

**आनं०**—( हंसत. ) असे मेले जिव्हाळे तरी किती आहेत ग तुझे ? खरेंच का ग—तो **पवार** फितुरला जाईल ? तर मग किनई—आपल्या कामाला **दुजोर** होईल ! इकडे **गारदी**—तिकडे **हुजरे**—बिथरल्यावर—अग **सारी पेशवाई आपलीच** !!! खरेंच गडे, तुळ्याच्या डोळ्याचें पाणीच कांहीं निराळें आहे ! आणीबाणीच्या वेळी मागें घेणारा नव्हे तो **"प्राणी"** !

**गजी**—( आवेशानें ) अन् अंदी **घरभेद्या** ! तशा मंदीं **दोनशें हुजऱ्यांचा नाईक** ! त्या लुबऱ्या चांपाजीचा वस्ताद ! मी बघा—बायको ठस्क्याची—मला फुस्क्याची संगत कुठली जी खपायला ! ( हळूच ) पन—घा पाच तोडँ त्याच्या तोंडावर टाकलॅ पाहिजत !

**आनं०**—चिंता नाहीं—पण काम फत्ते केल्यावर हो ! मिंदा करून ठेवायला एकादा देतां येईल आधीं—पण अजून तो जमादार कां येत नाहीं ? तो पठाणही येणार ना बरोबर ?

**गजी**—येनार ह्मंजी—धर्मोला का येताया? हजार रुप्पयँ उचल्लँ कश्शा पाईं? जमादाराला घेरून धारून—इथ्थँ आनून गुजरून—वचनांत गुतवून बांधून—समर्द काम साधून द्यायचँ त्यानँच!

**आनं०**—हें तर खरेंच!—त्याला आणखीही **दहा हज्जार** देऊं केले आहेत—पण—तो **देवभोळा** पुरभैया अखेरपर्यंत टिकेल ना?

**गजी**—अजी एकदा वचनांत पक्का जखडला गेल्यावर जातोयू कुठ्ठं मेला!—पन—आपून—धनी साबाकून—तें! लिवून घेतलय् ना? नाहींतर—ऐन येळीं त्यो हुकमीबंदा ह्मनायचा—"दिक्खाव **दादासाबका हुकूम**" ह्मंजी—

**आनं०**—अग त्याच लेखावर तर सारी आपली भिस्त! देत होते कुठें—पण ही **आनंदी**च तो मिळवूं जाणे—(हंसते.)

**गजी**—(टाळ्या वाजवून) तर मंग झालँच काम **फत्ते**! पन त्यामंदी—ते बी लिवून घेतल्य ना—की त्या **चंडाळ चौकडीचँ चंदन** करावँ म्हून?

**आनं०**—अगॅ, आधीं तें **मूळखंडन** तर होऊं दे! मग—त्या मेल्या अडव्या तिडव्या **फांद्या** छाटायला ग काय वेळ?

**गजी**—(बाहेर कान दिल्यासारखें करून) भाईर कुन्नी आले जनू! तेच असत्याल—आनू का आमंदी?

**आनं०**—हें ग काय विचारणें—आण कीं ग!

( गजी जाते—आणि **जमादार** व **पठाण** यांसहित पुन्हा येते. ते दोघे आदबीनें मुजरे करून हात जोडून दूर उभे राहतात. )

**आनं०**—( त्यांजकडे हंसून पाहून ) यावें जमादार ! बसावें इथें—इथ्थें—या गालिच्यावर बसावें—( हातानें दाखविते. )

**सुमेर०**—माताजी ! हम यहीं भले हैं !

**आनं०**—छे छे—असे दूर कां ? इथ्थें—यावर बसावेंच ह्मणतें—उभे कां ?

**सुमेर०**—जो हुकुम ! तो खांसाहब, आपभी बैठियें !

**आस्मान०**—नहीं साहब, आपही बैठियें !

**सुमेर०**—नहीं नहीं—आपभी—बेशक बैठियें !—आपको मै दोस्त समझता हूं ! शागिर्द नहीं !

**आस्मा०**—नहीं उस्तादजी ! आप गुरू—मै चेला ! आपके बराबर बैठनेकी क्या मेरी लियाक़त है ! आपही बैठियें !

**आनं०**—( आपल्याशीं. ) या मेल्यांनीं "बैठियें—" "बैठियें"ची काय कवाईत चालविली इथ्थें ही ? ( उघड. ) अहो पण—तुह्मी गुरुचेलेही बसा ! हें किनई—तुमचें घरच समजा बरें ! परका का विचार आहे इथें ?

( दोघेही त्या गालिच्यावर कांहीं मर्यादेनें बसतात. )

अस्सें ! आतां कशी ही **शूर—बहादुरांची जोडी**—एकाजागीं शोभते आहे ! कां हो जमादार ! तुह्मी बहुतां दिवसांनीं दिसलांत ? ( पठाणाकडे पाहून ) हे मियां कोण ?—यांचें नांव काय ?

**सुमेर०**—जी हां बाईसाहब ! आपके दर्शन बहुत दिनसे हुए ! पर यह दास दादासाहबके पास हमेशः आया करता है ! ये मियां हमारे दोस्त—गार्दियोंके नायक हैं ! इनका नाम **मुहमद युसफ ऊर्फ आस्मानखान !**

**आनं०**—अगॅ बाई! केवढें हें लांबलचक अवघड नांव ! मी यांना आपलें—'**आस्मानखान**' च ह्मणेन.

**आस्मा०**—अम्मासाहब ! चाहे सो कहिये. यह बंदा बंदगीमें हाजिर है !

**आनं०**—(जमादाराकडे पाहून हंसत.) मुसलमान लोक—बोलण्यांत भारी मिठ्ठे! जमादार, तुह्मी—खुशाल आहां ना?

**सुमेर०**—जी हां बाईसाहब, **श्रीनरायनराय** पेशवा बहादुरके राजमें हमे क्या कमी है?—मजेसे खाते पीते हैं! प्रेमसे रामनाम लेते हैं—और **आनंद**से काल काटते हैं!

**आनं०**—काय ह्मटलेंत—**नारायणरायाच्या राज्यांत मजा** मारतां ? इतक्यांतच पूर्वस्थिति विसरलांत काय ?

**सुमेर०**—माताजी, **नरायनराय**भी तो आपहीके—कुलभूषण सपूत हैं न? **श्रीरघुनाथराय दादासाहब**के तो हम बनाये हुए **जमादार** हैं ! उनको क्या हम भूलेंगे ? अजी वेही तो एक—**ब्राह्मणोंमें** सूरबीरोंके कदरदान—जवान्मर्द **सर्दार** हैं !

**आनं०**—(हंसत.) एकूण उपकाराची आठवण आहे तर ?

**आस्मान०**—यह क्या कहिये अम्मासाहब ! हम लोग

तो आपही के ताबेदार हैं !—और आपही को जानते मानते हैं ! **नरायनराय** तो कलके बच्चे हैं !—वे क्या जानें बेचारे—**जवांमर्दी** किस **चिडियाका** नाम है !

**आनं०**—शाबास खान ! याचेंच नांव इमान!! असो. पण जमादार, मला एक—फार फार महत्वाची कामगिरी सांगायची आहे हो तुह्मांला—पण हे **मियां** इथें नसते तर—

**सुमेर०**—ये मियां तो हमारे भाई हैं—मददगार हैं—बेशक कहियें—

**आनं०**—तर सांगतें—पण ती अवश्य कराल ना ? नाहींतर—

**सुमेर०**—करने जोगी होगी तो—

**आनं०**—अहो आमचा कोणी—शत्रु—तो कसलाही—**जबरदस्त** असला तरी—त्याला—नाहींसा कराल का ?

**सुमेर०**—यह क्या सवाल है बाईसाहब ! अजी पेशवाके शत्रुओंको बिनष्ट करना ही तो हमारा **पेशा** है—फिर चाहे वह **ज़बरदस्त** होवे—चाहे **ज़ेरदस्त** !

॥ चौपाई ॥

" समबल होउ—अधिक बलवाना
क्षत्री न होय जो समर सकाना "

यह रविकुलभानु **श्रीरघुनाथजी** के मुखकी **बानी** है !—और हम—**क्षत्री** हैं—बस इस्से जानिये—

**आनं०**—( आपल्याशीं ) मेल्याचा मुद्दा सुटत नाहीं—ना-

ऱ्यावर भक्ति दिसते!–पेशव्याचे शत्रु विनष्ट करीन ह्मणतो! तर खरे **पेशवे** कोण हें याच्या सरळ अंतःकरणांत पुरें भरविल्यावांचून काम साधायचें नाहीं! तर करावें तस्सेंच (उघड.) शाबास **सुमेरशिंग**जी!–जातीचे खरे रजपूत तुह्मी!

**सुमेर०**–बाईसाहब! क्षमा कीजिये–न मुझको **सींग** हैं–न मै **रजपूत** हूं!

**आनं०**–तर तुमचें नांव काय? आणि जात कोण? साराच का मेला भ्रम!

**सुमेर०**–तो सुनियें–मेरा नाम **सुमेरुसिंह.** पर हम हिन्दुस्थानी लोग "**सिंह**" को "**सिंघ**" उच्चारते हैं!–जैसे "**नरसिंघ**"! "**पुरुषसिंघ**"!! पर दखनी लोग हमारे नामके आगे **सींग** लगाते हैं!– नहीं मालूम **बै**लके या **भैस**के! यह उनका अज्ञान है–और हमारा अपमान है. हमारी जात **क्षत्री.** "रजपूत" किसे कहते हैं–हम जानते नहीं. हां–**राजपूताने**के **क्षत्रियलोग**–अपने तई **राजपूत**–याने **राजपुत्र**–कहलाते हैं. वे लोग जातके सच्चे–**राजबंसी** हैं. पर उनके आचारबिचारमें कुछ फरक है. इस्से हम **हिन्दुस्थानी** क्षत्री लोग–उनसे रोटी–बेटीव्यवहार रखते नहीं.

**आनं०**–तर तुह्मी नांवाचे **सुमेरुसिंह**!–जातीचे **नरसिंह**–अर्थात् नरराज–ह्मणजे क्षत्रिय!!–आणि कर-

णीचे **पुरुषसिंह**—ह्मणजे पुरुषार्थी !!! (खानाशीं) खान ! तुमचेंही खानदान माननीय असेल नाहीं बरें ?

**आस्मान०**—खानके माने ही **सर्दार** है !

**आनं०**—(मान हालवून) तर जुळलेंच सारें!—वस्ताद **राजे** ! —**शागिर्द सर्दार** ! गुरु **सुमेरु**—शिष्य **आस्मान** ! बऱ्यांचें सारेंच बडें !

**आस्मान०**—अम्मासाहब ! हम काहेके बडे ! हम तो आपके हुक्मी बंदे हैं ! (हात जोडतो.)

**आनं०**—(हंसून) '**हुकुमीबन्दे**' ह्मणायला सोपें—पण हुकूम बजावतांना कठिण जातें बरें का ? असो.—जमादार ! तुह्मी हिंदुस्थानी—**क्षत्रिय**, वचनाचे बडे सच्चे असतां ह्मणून ह्मणतात हें खरें ना ?

**सुमेर०**—बाईसाहब ! "अपने मुंह आप मियां मिठ्ठू" क्या बन्ना ? इतनाही कहना बहुत है—कि हम **महाराज श्रीदशरथजी**के बंसज हैं;—कि जिन्होनें अपना बचन पालनेके लिये सब कुछ छोड दिया ! कहा है:—

॥ दोहा ॥

**या जगमें प्रिय सबनतें—प्राण औ पूत सुजान ॥**
**दशरथने दोनो तजे—बचन न दीनो जान ॥ १ ॥**

**आनं०**—अहाहा ! धन्य तीच जात, कीं जींत वचनाला येवढा मान ! पठाण ! तुमच्याही जातींत **इमान** ह्मणून मानतात ना ?

**आस्मान०**—अम्मासाहब ! क्या कहिये—हम लोगोंकी तो यही बात है:— **"जाय जान—न जाय ईमान"**! तो—फर्माइये अब—किस कामके वास्ते बुलाया है हमको ?

**आनं०**—अहो तें काम—ह्मटलें असतां तुह्मां शूरांना कांहीं भारी नाहीं—पण मेला त्यांत थोडा तिडा आहे हो !

**सुमेर०**—पर बिना कहे कैसे चलेगा ? क्या आप हम लोगोंपर बिश्वास रख सकती नहीं ?

**आनं०**—अहो तुमच्यासारख्या विश्वासुक शूर सर्दारांवर विश्वास ठेवायचा नाहीं तर ठेवायचा तरी कोणावर ? पण मेली बायकांची जात **अधीर** ह्मणतात हें खरेंच ! सांगायला ह्मणून मेला **धीर**च होत नाहीं ! पण—जमादार ! खरेंच सांगा—तुह्मांला माझ्या गळ्याची शपथ आहे—मी जें सांगेन तें करालच ना ?

**सुमेर०**—बाईसाहब, हम पहलेही कह चुके हैं—कि वह कार करने जोगा होगा तो हम करही गुजरेंगे !—

**आनं०**—तर करा ह्मटलें एवढें आधीं—बेलभंडार उचलून द्या मला—गजे, आण ग ती वाटी !

( बेलभंडाराची वाटी **गजी** त्याच्यापुढें आणून ठेवते. )

**सुमेर०**—( त्या वाटीकडे साश्चर्य पाहून ) यह क्या चीज है ? इसे क्या करना ? ( वाटींत बोट घालून ) अरे—इसमें तो हलदीकी बुकनी—और बेलकी पतियां हैं !

**आनं०**—यालाच ह्मणतात बेलभंडार ! कोणचेंही काम

करण्याच्या आधीं—तें करणारानें अशी आणक्रिया करावी लागतेच—ह्मणजे तें काम हटकून सिद्धीस जातें !

**सुमेर०**—हरे राम! क्या तुम हमको आनकिरिया खिलाती हो ?

**आनं०**—हें खायाचें नाहीं—उचलून द्या ह्मणजे झालें !

**सुमेर०**—क्या—"उचलून द्या" ?

**आस्मान०**—कुछ होगी दखनी घिसघिस सुसरी ! उठाय दीजिये—बस हो चुका—

**सुमेर०**—क्या उठाय दीजिये ? अजी मियां ! अनजाने क्रिया कैसे खाना ? बाईसाहब ! हमारा **बचन अटल** है ! बेलभंडारसे क्या काम ?

**आनं०**—पण—आमची आपली बायकांची समजूत ! मी का तुह्मांला फसवीन ह्मणतां ? हवें तर मी हव्वी ती शपथ घेतें आधीं—मग तर झालेंना ? अहो जमादार! तुह्मी माझें येवढें काम कराल तर—मी तुह्मांला पहा अशी देणगी देईन, कीं—माझे जन्मभर गुण गाल—

**आस्मान०**—उस्तादजी ! अब और क्या चाहिये ?

**सुमेर०**—चाहिये यही, कि **बाईसाहब किरिया** कराना छोड—हुकुम करैं—

**आस्मान०**—(हसून) इसेही कहते हैं **तिरयाहठ** !

**सुमेर०**—पर भाई, हम डरते हैं—यह **तिरयाचलि-**

त्तर न होय कहीं! आगे सौगंध खिलायके—क्या जाने क्या करवाया चाहती हैं ये!

**आनं०**—(आपल्याशीं.) अरे मेल्या गद्ध्या! आत्तां का शुद्धीवर आलास? आत्तां या माझ्या कपटजालास—स्त्रीचरित्र ह्मटल्यानें का तूं सुटणार? अरे जों जों तूं त्यांतून निसटण्याचा प्रयत्न करणार, तों तों तूं त्यांत अधिकाधिक गुरफटला जाणार! (उघड.) जमादार! 'स्त्रीचरित्र' या अपवित्र शब्दाचा—कुठें उपयोग करायचा—हें तुह्मांला देखील कळूं नये—हें परमाश्चर्य नव्हे काय? शिव शिव! जो सर्व पेशवाईत नांवाजलेला सत्यप्रतिज्ञ—रामभक्त—कुलीन—शूर—सर्दार—त्यानें माझ्या परम पवित्र चरित्रास "स्त्रीचरित्र" ह्मणावें—आणि मीं—राजराजेश्वरीनें तें खालीं मान घालून—निमुटपणें ऐकून घ्यावें! यासारखें लाजिरवाणें—जिणें तें कोणतें मेलें! यापेक्षां मरण काय वाईट! (डोळ्यांस पाणी आणते.)

**आस्मान०**—(तिच्या तोंडाकडे बघून) इन आखोंमें—आंसू! बाईसाहब! आप क्या रोती हैं? उस्तादजी, अब तो हमसे यह देखा जाता नहीं—आगे मर्जी आपकी! (पाठ फिरवून बसतो.)

**सुमेर०**—बाईसाहब! रोनेको क्या हुआ? मैंने ऐसा कौनसा कुबचन कहा आपको? क्या हमने बिनाबिचारेही क्रिया करना? कहा है न? "बिनाबिचारे जो करै सो

पीछे पछताय" ! आपकी इच्छा हो तो बेलभंडार उठायके देता हूं—पर ऐसी आग्या कीजिये कि जिस्में सबका **धर्म** बना रहै ! क्योंकि इस असार **संसार**में **धर्म**ही तो **सार** हैं ! शास्त्रकार भी तो यही कहते हैं:—

**चला लक्ष्मीश्चलाः प्राणाश्चले जिवितमंदिरे**
**चलाचला च संसारे धर्म एको हि निश्चलः॥**

**आनं०**—अगदीं खरें—तस्सेंच करणार मी—तर द्या तें उचलून (एकीकडे) मेल्याचें ब्रह्मज्ञान बोकळतें आहे इथेंही!

**सुमेर०**—तो लीजिये (तो उचलून देत असतां त्याचा हात कांपतो.)

**आनं०**—(तो घेऊन) धन्य तुमची स्वामिभक्ति—उपकाराची पुरी आठवण ! पठाण ! तुह्मीही खातांना **आण**—आपल्या अल्लाची ?

**आस्मान०**—अल्लाह अल्लाह ! अजी अम्मासाहब ! जहां हमारे उस्तादका पसीना गिरेगा वहां हमारा खून बहेगा ! यही हमारी किरिया आन ! बस फर्माइयें—और देखियें कैसे कार कर बतलाते हैं हम !

**आनं०**—पण मी जें तुह्मांला फर्मावणार आहें—तें—ऐकल्याबरोबर अंमळ विपरीत भासेल—पण पूर्ण विचारांतीं तें—कृत्य करणें—हें **पेशवाईच्या भल्याखातर आणि आमच्या जिवाच्या बचावाकरितां अगदीं आवश्यक आहे**—असें कळून येईल !

**सुमेर०**—तो फर्माइये ! देर क्यौं ?

**आस्मान०**—अम्मासाहब! हमको बिचार उचारसे दरकार क्या ? हम तो आपके ताबेदार हुक्मबर्दार हैं— सिर्फ़ आपके हुक्मकी देर है !

**आनं०**—शाबास खान ! यालाच ह्मणतात इमान ! सेवकास खावंदाची आज्ञा काय ती प्रमाण—शिरसावंद्य ! असो. तर ऐका—जो कर्मचांडाळ—दुष्ट मंत्रीमंडळास अनुकूल होऊन—आपल्या वडिलांस बंदींत घालून— राज्याचा खजिना सफई लुटवून फस्त करून— आपण मस्त बनून—रात्रंदिवस चैन करीत पडणारा श्रीमंतकुलांगार—त्यास एकदम पकडून— छाटून—ठार करा ह्मणतें !

**सुमेर०**—(भांबावून) ऐसे कुलांगार का नाम ?

**आनं०**—त्याचें नांव—जळो तें नांव—नारायणराव पेशवा ह्मणविणारा पापी चांडाळ !

**सुमेर०**—(वेडावून) क्या कहा—नारायणराव पेशवाको?— हरे राम ! क्या—यह सत्य कहती हो ?—या हमारी स्वामिभक्तिकी परिच्छा लिया चाहती हो ? साफ़ साफ़ कहिये—

(सुस्कारा सोडतो.)

**आनं०**—सत्यच बोलून तुमच्या दाशरथी सत्यवचनाची—शौर्याची—धैर्याची—परीक्षा पहातें हो !

**सुमेर०**—(चवताळून) मेरे सत्यबचनकी—परिच्छा लिया चाहती है तू—असत्यखानि ? क्या मुझसे ब्रह्म-

हत्या–स्वामिहत्या करवाती है तू कृत्या? राम राम! इसी लिये तैंने बेलभंडार उठवाया मुझसे? पापिन! यही क्या तेरा "परम पवित्र चरित्र"? "राजराजेश्वरी-धर्म"? चंडालिन! क्या तुझको तुझ जैसा पापी चंडाल–वैसा चंडालकर्म करनेको कोई नहीं मिला–जो मुझ ऐसे सीधे सादे सुरजबंसीको तैंनें अपने कपटजालमें पूरा उलझाया? हाय हाय! क्या यह पलमें प्रलय हो गया! राम राम! मुझसा कपूत जनमतेही क्यौं नहीं मरा? रघुकुलमें जन्म लेकर मैंनें क्या किया? स्वार्थ साधा नहीं!–परमार्थ सुधारा नहीं!–धर्म बिगाडा! कुल उजाडा! तो फिर–अब यह कुलकलंक जीने जोग न रहा!

( धाडकन् जमिनीवर अंग टाकतो. )

**आस्मान०**–(आपल्याशीं.) यह शेर जो बिगड गया तो हमारा–कीया कराया–सब कुछ बिगड जायगा. तो इस्की सब सह लेना–लेकिन इसको अपने क़ाबूसे बाहर न जाने देना चाहिये. (त्याच्याजवळ जाऊन) तक़सीर मुआफ़! उस्तादजी! यह क्या सोच है?

**सुमेर०**–(संतापून) अबे पोच! सोचकी क्या तू पूछता है? सोचकी जड तो तूही है! चंडाल! चेला बन गुरुकी गर्दनपर ख़ूबही छूरा फेरा तूंने!

**आस्मान०**–(हात जोडून) उस्तादजी! कुछ तो ग़ौर कीजिये. अगर बन्दा गुनाहगार ठहरा तो–आपकी शम-

शेरके आगे–यह सिर मोजूद है ! (डोकें पुढें करतो.) बेशक काट डालिये !

**सुमेर०**–तो फिर तूंने मुझे घेरधारके इस हत्यारीके पास–ब्रह्महत्या करानेको क्यौं ले आया ?

**आनं०**–( आपल्याशीं.) अरे मेल्या गद्धया ! मला हत्यारी ह्मटल्यानें **कुठें ती 'ब्रह्महत्या'** चुकते आत्तां ? आतां ती हत्या तुझ्याच हातून ही हत्यारी नव्हे **पंचहत्यारी** करविणारच करविणार ! ( उघड ) जमादार ! कांहीं तरी तुमच्या बोलण्यांत ताळतंत्र ?–अहो जिला–ज्या तोंडानें **"माता"–"माता"** ह्मटलें–तिला त्याच तोंडानें–**हत्यारी–कृत्या** ह्मणतांना मेली ती **बेताल बत्तिशी** कशी नाहीं झडली !–मला कोण समजलांत तुह्मी ? तुमची स्वामिनी ना मी ?

**सुमेर०**–अरी **डाकिनी** ! जिस बालकको तैंने अपनी गोद खिलाया–उसीको **बधने** कहनेवाली तेरी सडियल **जिभिया** न झड पडी ! ऐ **कृत्या** ! तुझे जो मैं **"माता"** न बोल जाता–तो चंडालिन ! तेरे तन बदनके तिल तिल जैसे खंड खंड कर डालता इसी खड्गसे! ( समशेर उगारतो–ती मागें पळते.) जब **धरमपर** आन पडी है– तब जानकी परवाह किस्को ! ! !

**आस्मान०**–( हात जोडून ) उस्तादजी ! जरा सब्र कीजिये ! बाईसाहबका सब हाल अव्वल सुन लीजिये ! फिर–अ-

गर वे मतलबी झूठी ठहरीं—तो यहांसे उठ चल दीजिये चुपचाप! बस छुटकारा पाया! मगर—**राय नरायन** ही कुसूरवार ठहरे, तो फिर—**मालिककी बंदगी बजालानेमें**—हम लोग ताबेदार—गुनाहगार कैसे ठहर सकते हैं?

**सुमेर०**—पर मियां, **राय नरायन** पेशवाके होते—हमारे **मालिक** दुसरे कौन हो सकते हैं?

**आस्मान०**—(हात जोडून) तकसीर मुआफ़! जिन्होने उसी नरायनको **मालिकेमसनद** किया—वह **रघुनाथरायदादासाहब!**—और आपकोभी ऐसा बडा आहेदाः बख़्शा—वही **दादासाहब!**—जो **पेशवाकी** फौज़ के मालिक हैं—वही **दादासाहब** हमारेभी **मालिक** हैं साहब! उन्हीकी ये बाईसाहबा जानी **रानी** हैं! इनका **हुक्म** सोई उनका हुक्म—तिस्परभी मैं कहताहूं—इनकी हक़ीक़त सब सुन लीजिये—अगर वह सच्ची मालूम पडी तो हम उस काममें पडेंगे—नहीं तो हरगिज़ नहीं—इतनी अर्ज़ बन्देकी सुन लीजिये साहब! (हात जोडतो.)

**आनंद०**—शाबास खान, किती छान तोडजोड काढलीत ही! मीही पण तेंच—बजावून सांगतें,—कीं जर मी अपराधी ठरलेंच—तर मग बेलाशक—या पापिणीचीं 'खंडें खंडें' करा किं हो जमादार! ह्मणजे तुह्मालाही पाप लागणार नाहीं व मीही त्या पाप्याच्या जाचांतून एकदाची

मुक्त होईन! त्या मेल्या सडेल सिंहगडावर—सडसडून—तडफडून—मरण्यापेक्षां—या—नरसिंहाच्या रामभक्ताच्या हातून चटकन राम ह्मटलेलें बरें!

सुमेर०—यह क्या हाल है खाँसाहब ? सिंघगढपर सडकर क्यौं मरती हैं ये ?

आस्मान०—शायद्—नरायनरायके दिलमें—इनको उस गढपर कैद करके रखना होगा!

आनं०—(कळकळून) अहो नुसत्या दिलांतच नाहीं—अमलांतही आलेंच ह्मणायचें तें! नजरबंद—कैदी तर आहोंच इथें—आतां जन्मकैदी करून त्या गडावर सडत टाकण्याचा पेशवे—बहाद्दरांचा—लेखी सक्त हुकूम सुटला आहे हा पहा! (एका डब्यांतून काढून त्यांच्या पुढें टाकते.) नानाच्या हातचा—खुद्द हुजूरच्या सही—शिक्के मोर्तबासुद्धां—नुक्ता कालच लिहिलेला—माझ्या हातीं—बहुत खर्चानें—बड्या मुष्किलीनें लागला! वाचा ह्मटलें—वाचा जमादार! घ्या संशय फेडून!

सुमेर०—(तो हातीं घेऊन) बाचूं क्या खाक ? यह तो मुडिया मरहट्टीमें—पिशाच लिपिमें लिखा है! हम तो देवनागरीही लिखते पढते हैं!

आस्मान०—यह तो हमभी नहीं पढ सकते—मगर इतना तो बेशक कहे देते हैं, कि यह दस्तखत हुजूरकेही हाथका है और यह शैतानी नवीसी—उस शैतान नाना फडनवीसकेही हातकी है! तो फिर बाईसाहब, आपही पढ सुनाइयें—

**आनं०**—अहो तें—मीं वाचून उपयोग काय ? संशय फिटला पाहिजे ना ?

**सुमेर०**—पर पढके तो सुनाओ—देखें भला लिखा है क्या!

**आनं०**—तर ऐका—पण नंतर—कुणा तरी खऱ्या—परक्या-कडून वाचवून घ्याच बरें—( वाचते. ) "राजश्री हरिपंततात्या "फडके—यांसि विनंती उपरी—आजपावेतों तुह्मी बहुत नेकना-"मीचीं व जवांमर्दीचीं बहुत कामें केलींत—हें ध्यानीं आणून—"तुमच्यावर ही बहुत जबाबदारीची कामगिरी सोपविण्यांत येते "आहे—सबब तुह्मीं ती बहुत खबरदारीनें बजवावी—त्यांत "तुमची बहुत सर्फराजी होईल:—तुह्मी देखत हुकूम आमचे "शिरजोर तीर्थस्वरूप ( दादासाहेब काका हें नांव वाचतांना गाळून) व "त्यांचें फाजिल कुटुंब—**आनंदीबाईसाहेब** काकू—या उभ-"यतांस एकदम कैद करून—सिंहगडावर नेऊन बहुत बं-"दोबस्तानें ठेवणें——त्या बंडखोरांच्या पायांत—ते जंगी लंगर "ठोकून"—( सद्गदित होऊन ) जमादार! कुठें तरी—कधीं तरी—कुण्णीं तरी अशी—जबर नव्हे अमानुष शिक्षा—आपल्या हितकर्त्या वडिलांस दिली असेल कायहो ? असो—पुढें ऐका:—"त्या खोडकर जोडप्यास—त्या अंधारकोठड्यांत—"वेगळें वेगळें कोंडून—जेवायास सांजसकाळ—फक्त कांजी "देत जावी—सारांश—त्या बदमाषांवर सक्त नजर ठेवावी—"हे विनंती." ( गाहिवरून डोळ्यांस पाणी आणून ) देवारे देवा ! दे एकदाचें मरण ! सोडीव या यमयातनांतून—अशा या-

तना—अशा दुःसह यंत्रणा—त्या यमपुरींतही, महापातक्यांस देखील भोगाव्या लागत नसतील! (रडून धाडकर पडते.)

**आस्मान०**—(आश्चर्ययुक्त मुद्रेनें) "लाहौल वला कूअत"! वाहरे मियां राय नरायन! क्या यह तेरी करतूत!—अबे खुद अपने **चचा चचीको कैद**!—वहभी उस सडियल गढके अंदर!—तिस्पर—उनको **अंधियारी** कोठडीमें बंद-कर!—वहभी जुदे जुदे!—और पैरोंमें **बेडियां** ठोकवा-कर!—और खानेको खुराक—**सिर्फ़ कांजी**! वहभी—सु-बहोश्याम!—और तिस्पर—**सख़्त नज़र! पत्थर पडें ऐसी तेरी बदनज़रपर**! है है! क्या यह **गज़ब** है! क्या **सितम** है!! क्या **जुल्म** है!!! अबे **शैतानके पिल्ले**! जिन्होने तुझे अपनी गोद खिलाया—और बहुतेरे लाड ल-डाकर—बडा करके **अपनी राजगद्दी बख़्शी**! वे **बद-माष**? अबे **बदमाषोंका बादशाह** तो तूंही है—जो ऐसी मनहूसी **बदमाषी** कररहा है! (गजी आनंदीस उठवून वसविते तें पाहून) अम्मासाहब डरना मत—

**सुमेर०**—(भ्रमांत पडून) ये खेल कुछ खयालमें आते नहीं भाई!

**आस्मान०**—इसीवास्ते उस बदमाष खेलाडूको ख़ा-कमें मिलाना चाहिये!

**सुमेर०**—पर मियां!—**राय नरायनकी जान** लेना—

राम !–कुछ हंसी खेल नहीं–खुद अपनी जानपै खे-
ा है ! उस्को मारेपर हमको कौन बचने देगा ?

आनं०–अहो, ज्या बहादरांनीं आमच्या राज्यांतला
ांटा उपटून–निष्कंटक राज्य करून, आमच्या स्वा-
न केलें; त्यांच्या जिवांवर उठण्याची कोणा मेल्याची
य व्याली हो ? मग आमचीच द्वाही–साऱ्या पेश-
ईत फिरणार ना ?

सुमेर०–तो क्या–वे आपके पूरे बैरी–नरायनरायके
चे हिमायती–चुपचाप बैठे रहेंगे ? बदला न लेंगे ?
जी बाईसाहब ! आप हो कहां ? नाना !–बापू !–
त्या !–मामा ! ये आगके गोले !–तमाम पेशवाई-
ा फूंक देंगे ! हरे राम !

आनं०–अहो, मग ते मेले कापसाचे गोळे !–लुळे !
ाकलेच फुंकून ह्मणून समजा ! कितीही शिरजोर झाले
री चाकरच ते ना ? पायांतलीं खेटरें पायांतच असायचीं !
मेले ढिले भटभाई–तुमच्या पांच हजार थेट हिन्दु-
ानी कडव्या लढवैया भैयांपुढें काय टिकाव धरणार ?
ऱ्यांत साऱ्या पेशवाईच्या सेनेचे सेनाधिपति–आह्मीच ना?
आमचा हुकूम ती सेना ऐकणार का त्या खर्डेघाशांचा
ऐकणार ? त्याशिवाय आमचे दोस्त सर्दार आपआपल्या
फौजफांट्यानिशीं आमची पाठ राखण्यास असणारच
तय्यार !

**सुमेर०**—पांच हजार गारदी—आपकी तरफ होंगे कैसे?

**आनं०**—( हंसून ) कां बरें होणार नाहींत ते सरळ शिपाई आमच्याकडे ? हे—त्यांजवरील मुख्य **सर्दारबहादर सुमेरसिंहजी जमादार** आमचे—तर्फेचे झाल्यावर ? तुमचें शहाणपण—तुमचें वजन—व आमचें धन—**ही त्रयी** कोणास बरें, आपलेंसें करणार नाहीं ? तर मी—आजच्या आज—सर्व गारद्यांस बक्षीस देण्याकरितां द्रव्य पाठविणार ! त्या पांच हजारांस पांच लाख—व त्यांजवरील अम्मलदारांस ह्मणून—दोन लाख !—**खान** ! तुह्मीही आलांत बरें का त्यांत !—व खुद्द तुह्माकरितां **दोन लाख**—कारण—तुमच्याच जोरावर त्या सर्वांचा जोर !—एकून नव लाख रुपयांचें सोनें नाणें तुमच्याकडे देतें धाडून—तें नेण्याकरितां तुमच्याकडील—तुमच्या खातरीचे पन्नास हत्यारबंद जवान द्या पाठवून. हें काम फारफार बेमालूम झालें पाहिजे, हें सांगणें नकोच !—

**आस्मान०**—आप बेफिक्र रहिये इस बाबमें- बेशक भेजवाइये !

**आनं०**—तें तुह्मीं आज रात्रींच—सर्वांस वांटून टाकून त्या सर्वांस तय्यार करून ठेवा. इकडील वर्दी येतांच त्या सर्वांनीं मिळून शत्रूंवर तुटून पडायाच्या जय्यत तय्यारीनें आलें पाहिजे ह्मटलें.

**आस्मान०**—बहुत खूब ! क्या बात है ! बाईसाहब !

हरे राम !–कुछ हंसी खेल नहीं–खुद अपनी जानपै खेलना है ! उस्को मारेपर हमको कौन बचने देगा ?

आनं०–अहो, ज्या **बहादरांनीं** आमच्या राज्यांतला **कांटा** उपटून–**निष्कंटक राज्य** करून, आमच्या स्वाधीन केलें; त्यांच्या जिवांवर उठण्याची कोणा मेल्याची माय व्याली हो ? मग **आमचीच द्वाही–साऱ्या पेशवाईत** फिरणार ना ?

सुमेर०–तो क्या–वे आपके पूरे बैरी–नरायनरायके सच्चे हिमायती–चुपचाप बैठे रहेंगे ? बदला न लेंगे ? अजी बाईसाहब ! आप हो कहां ? **नाना !–बापू !–तात्या !–मामा !** ये आगके **गोले** !–तमाम पेशवाईको फूंक देंगे ! हरे राम !

आनं०–अहो, मग ते मेले कापसाचे **गोळे**!–**लुळे** ! टाकलेच फुंकून ह्मणून समजा ! कितीही शिरजोर झाले तरी चाकरच ते ना ? पायांतलीं खेटरें पायांतच असायचीं ! ते मेले ढिले **भटभाई**–तुमच्या पांच हजार थेट हिन्दुस्थानी कडव्या लढवैया **भैयांपुढें** काय टिकाव धरणार ? तशांत साऱ्या पेशवाईच्या सेनेचे **सेनाधिपति**–आह्मीच ना? आमचा हुकूम ती सेना ऐकणार का त्या **खर्डेघाशांचा** ऐकणार ? त्याशिवाय आमचे दोस्त सर्दार आपआपल्या फौजफांट्यानिशीं आमची पाठ राखण्यास असणारच तय्यार !

**सुमेर०**—पांच हजार गारदी—आपकी तरफ होंगे कैसे?

**आनं०**—(हंसून) कां बरें होणार नाहींत ते सरळ शिपाई आमच्याकडे ? हे—त्यांजवरील मुख्य **सर्दारबहादर सुमेरसिंहजी जमादार** आमचे—तर्फेचे झाल्यावर ? तुमचें शहाणपण—तुमचें वजन—व आमचें धन—**ही त्रयी** कोणास बरें, आपलेंसें करणार नाहीं ? तर मी—आजच्या आज—सर्व गारद्यांस बक्षीस देण्याकरितां द्रव्य पाठविणार ! त्या पांच हजारांस पांच लाख—व त्यांजवरील अम्मलदारांस ह्मणून—दोन लाख !—**खान** ! तुह्मीही आलांत बरें का त्यांत !—व खुद्द तुह्माकरितां **दोन लाख**—कारण—तुमच्याच जोरावर त्या सर्वांचा जोर !—एकून नव लाख रुपयांचें सोनें नाणें तुमच्याकडे देतें धाडून—तें नेण्याकरितां तुमच्याकडील—तुमच्या खातरीचे पन्नास हत्यारबंद जवान द्या पाठवून. हें काम फारफार बेमालूम झालें पाहिजे, हें सांगणें नकोच !—

**आस्मान०**—आप बेफिक्र रहिये इस बाबमें- बेशक भेजवाइये !

**आनं०**—तें तुह्मीं आज रात्रींच—सर्वांस वांटून टाकून त्या सर्वांस तय्यार करून ठेवा. इकडील वर्दी येतांच त्या सर्वांनीं मिळून शत्रूंवर तुटून पडायाच्या जय्यत तय्यारीनें आलें पाहिजे ह्मटलें.

**आस्मान०**—बहुत खूब ! क्या बात है ! बाईसाहब !

आप औरतकी जात होकर मर्दोंको मात करती हो म-सलहत—और मनसूबहमें ! (जमादाराकडे हंसत पाहून) लीजिये साहब ! दो लाख रुप्पै नक्द ! ख़रीदिये अच्छीसी जा-गीर—और बन बैठिये ज़ागीरदार—साहबे अख़तियार ! ! !

**सुमेर०**—अजी क्यौं मनके लड्डू फोडते हो मियां ! जान पडेगी, जब जानपै आन पडेगी !

**आस्मा०**—लेकिन—यहां किस्को जानकी परवाह है **शे-रमर्द** हैं—शमशेर चलाके—नाम व माल कमाना जा-नते हैं !

**सुमेर०**—पर मियां आस्मान ! किस्के भरोसे ऐसे आस्मान पै कदम रखते हो ? कुछ **दादासाहब**की भी राय ली है—ऐसीं काररवाई करने को ?

**आस्मान०**—जी हां—खुद उन्हीकी मानी क्या—औ उनकी रानी की मानी क्या—दोनों के माने एकही हैं !

**आनं०**—राहो मेली ती राणी—खुद राण्याचाच परवाना पहा ना—

(पेटींतून एक कागद काढून सुमेरसिंहापुढें टाकते.)

**सुमेर०**—(कागद हातीं घेऊन) यहभी तो वही शैतानी लिखावट है.

**आस्मान०**—(त्याचेकडे पाहून) लेकिन यह लिखावट—और यह दस्तख़त तो खुद **दादासाहिब**ही के हाथ के से मालूम पडते हैं ! अच्छा—आजमा लेंगे अच्छी तरहसे—

पर बाईसाहब, यहभी खत–आप ही पढ सुनाइयें–मॅहरबानी करके—–

**आनं०**–बरें आहे–पण तुह्मीही परभारे पक्की चौकशी करून घेऊन, नंतर हुकुमाप्रमाणें करावें ह्मणतें–वाचतें तर–( वाचते. )

“राजश्री सुमेरसिंगजी जमादार हुजूरगारदी यांसि–उ-
परी–“फरमाविण्यांत येतें ऐसाजे कीं:–तुह्मी देखत हु-
“कूम–चिरंजीव नारायणराव साहेब पेशवे यांस बेलाशक
“मारावा. अनमान करूं नये–तो आमचा जानी दुष्मन
“आहे–कळावें.”

**सुमेर०**–क्या पढा “चिरंजीव” ? और “मारावा”? यह कैसे बाईसाहब ?

**आनं०**–तर नारायणाला का “तीर्थरूप” लिहायचें ? मायनाच तो.

**सुमेर०**–पर “**चिरंजीव**” कैसे मरेगा ? हरे राम ! क्या यह अनर्थ !

**आनं०**–अहो अनर्थ नव्हे–अन्वर्थच आहे तें पद–“**जानी दुष्मन**” !

**आस्मान०**–उस्तादजी ! अब तो जानी न ? बस जाने दीजिये–

**आनं०**–तर–ठरल्याप्रमाणें तुह्मी पन्नास जवान आजच पाठवा–मीही ते नवलाख जमवून देतें पाठवून त्यांज बरोबर–

**आस्मान०**—( नेत्रानें खुणवून ) बेशक भेजिये ! आपके इहसानपै हमारी जान कुर्बान है ! तिस्पर हमारे उस्तादने किरिया खाई है!—भला—वे क्या अब **"नहीं"** करके अपने **पुरखोंको नरकोंमें डालेंगे** ? नहीं—अपना बचन पालेंगे पै पालेंगे ! ! !—अच्छा तो बन्दोंकी बंदगी ! ( मुजरे करून जातात. )

**गजी०**—( पुढें येऊन ) बाईसाब ! आजचॅ आपलॅ शानपन—किती म्हून वानावॅ ! म्हतलॅ—जातोय् की काय आपल्या जाळ्यांतून निसटून—त्यो सिंव्व !—पन आमच्या पुन्या सिकारी बाइसावांच्या पकडींतून कोनतॅबी सावज सुट्टल कस्सॅ ?—मी तर बाई अक्षी गरभ्भगळित होऊन—बसलें त्वांड लपवून—एक कोपरा धरूनशनी ! ( हसते. )

**आनं०**—( हंसून ) अग, आजचा प्रसंगच तस्सा ! मी देखील लटपटलें!—म्हटलें करतो तुकडे की काय ! ( मोठ्यानें हसते. ) त्या पिसाळलेल्या सिंहापुढें करायचें काय ! पण धन्य त्या पठाणाची प्रसंगस्फूर्ति ! त्यानें तऱ्हतऱ्हा करून—अखेर आणलाच ताळ्यावर त्याला ! तरी पण—अजूनही—त्याची खातरी म्हणून सांगवत नाहीं बाई ! प्रसंगीं—तो **हरे राम्या—"हरे राम"** म्हणून—तें काम—**"हत्या"** समजून—हातचें घायचा टाकून !

**गजी०**—हत्तेच्या ! अत्तां त्यो "हरॅराम" म्हनो की "खरॅराम" म्हनो ! पन ती हत्या म्हून—त्याच्याच हा-

तून होनार! हें आपून अक्षी लक्षांत ठिवा! अजी, एकदा त्याची मुठ्ठी गरम झाल्यावर व्हावॅ तें करम करील त्यो–जातोय कुठ्ठं! "दाम करी काम"! अन् त्याशिवाय–त्या पठ्ठानाच्या मगरमिठ्ठींतून कुठलाजी सुट्टायला त्यो! पन बाईसाब! आपून–ती चिठ्ठी–नारायनाच्या सईची कुठून जी काडली?

**आनं०**–अगॅ–पुढचें भविष्य मला दिसत होतें ह्मणून–मी आपल्या तय्यारीनेंच होतें ह्मटलें! त्या चांडाळ चौकडीवरही ताण करणारा–**कल्पनाबाज–बिलंदर-जवान**–हव्या तसल्या सह्यांसारख्या सह्या–कागदांसारखे कागद, पत्र–लेख–शिक्के मोर्तब बनावणारा बहाद्दर आहे आमच्याजवळ! कोण असावा बरें तो? येतोय् का तुझ्या ध्यानांत?

**गजी०**–(थोडा विचार केल्यासारखें करून) हं–हं–आलॅं ध्येनांत! त्यो खालमान्या–आंतल्या गांठीचा कारकून **डावऱ्या** अस्सल—

**आनं०**–शाबास गजाऊ! तर तोच तो! आणि त्याचेंच तें कसब! जातें बाई आत्तां–तिकडे थापा देऊन **नऊ लाखांची भरती** केली पाहिजे ना—

(जाते.)

---

## अंक चवथा.

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—वानवडी—मारुतीचें देऊळ.

वेळ—मध्यान्ह.

(**नरसिंह—गुरुदत्त—खड्गबहादूर—रणमल्ल** बसले आहेत).

**नर०**—कहो भैया ! या पिरथी की पीठमाँ—बिरहम्म-देवने सबतें उत्तिम बस्त कौनसी किहिन है भला ?

**गुरु०**—सब—सबकाहूतें उत्तिम ? तो भाय सुनियो—मोहिका तो—**अरुन बरुन नयनी—तरुनी तिरया** ही सबनतें नीक लागती है ! रामधांई !—जेहिका द्याखतही नैन सिरात हैं !

**खड्ग०**—वाह भाई ! काह बांत है ! पर जौ तुम ति-**रया चलित्तर** जानते—तौ जान परती—कि **तिरया ससु-रिया** द्याखत—नैन सिरात का पिरात हैं ! हम तो भाय ! सब काहूतें उत्तिम—या **लोहा** ही को मानित जानित हैं ! (खड्ग दाखवितो.)

**सर्व०**—(हंसून) तब ही तो "**खड्गबहादुर**" कहावत हो !

**गुरु०**—क्यौंन होई—बहादुरन का यही तो काम है—कि काहू—**मिर्गनैनी—गजगौनी—पिकबैनी—बैरागन** कै

पाछें पाछें डोलैं–पर–मुंह सों बोलैं–कि–तिरया ससुरिया ग्राखै, नैन पिरात आहिन्–याहितें कहिन है, कि–

"पर उपउपदेस कुसल बहुतेरे"

**खड्ग०**–अरे भाई! उही बैरागनका चेला बन, हम **तिरया चलित्तर** सीख लिहिन्! हाय हाय! कहा नैना चमकाय गई वह **ठगनी**! हमारि सुध बुध हारि,–हमका मारि–पार निकरि गई ससुरी!

(सर्वजण हंसतात.)

**रण०**–याहीतें–हम कहित हैं–कि–सब काहूतें उत्तिम चीज–**बिधना ने मिर्तलोकमां–बिजियाही** किहिन है!

**सर्व०**–सत्त है! बूटी बिन सब कुछ झूटी है!

(सर्व टाळ्या वाजवितात.)

**नर०**–याहितें कहिन् है कि:—

॥ दोहा ॥

**बिजिया कहैं सो बावेर; भंग कहैं सो कूर**
**यही अमीरस पत्तिहै—नैन रहैं भरपूर!**

**रण०**–वाह भैया वाह! का बात है! और अस हू कही है:—

॥ दोहा ॥

**भंग-गंग दो बहिन हैं–बसै सदाशिव अंग**
**मुर्दातारिनि गंग है–जिंदातारिनी भंग॥**

**नर०**–सियाबास भैया!–और अस हू कहिन है न?–

॥ सवैया ॥

**सूर पिवै रनमस्त रहै—गजमत्तके दंत उखारनको**
**बाल पिवै गद गद हसै—अरु बूढ पिवै झख मारनको**

कूर पिवै बक बक्क बकै—हंडियाभर अन्नबिगारनको
महादेव कहै सुन पारबती—बिजिया मत देहु गवारनको १

**रण०**—सत्त है! यही एक तो **बंभोला** की पियारी **जडीबूटी—अमिरत** की **घूटी** है! जेहिके भरोसे वह मसानमें बसतहै—भूत परेतनमें ख्यालतहै! और उही के रंगमाँ रंग—सदा मगन रहितहै! (**आस्मानखान** येतो त्यास पाहून.) आव—आव खानसाहिब! भले आये!

**आस्मान०**—क्यौं भय्याजू! क्या बूटी छन रहीहै?—तो हमको भी मिलेगी न?

**नरसिंह०**—अलबत्ता—एक दुई पियाले पी लीजिये मियांजू!

**आस्मान०**—(आपल्याशीं.) इन भंगडोंका झुकानेके वास्ते हमको भी भंगड बन्ना चाहिये—तबही—ये हमको चाहेंगे! (उघड.) अजी, पियाला दो पियालोंसे क्या मज़ा आयगा? दो एक लोटे तो झुकाने होना न? कहा है नः—

॥ दोहरा ॥

भंग जु ऐसी पीजिये—ज्यौं जमुनाको कीच।
घरके जानै मरगये हम भंगरंगके बीच ॥

**सर्व०**—वाहवाह! का बातहै! येहिका नाम सच्चा **सौक**!

**आस्मान०**—अजी भाई! इसी की बदौलत हम बादशाह हैं!

॥ बतै ॥

न हाकिम का खटका—न रय्यत का गम
अरी वाहरी भंग—औ वाहरे हम ॥

**नर०**—वाहवाह् मियां वाह् ! का बातहै ! तबही तो तुम हमार दोस्त बने हो !

**आस्मान०**—हां—इसी लिये तो हम तुमको एक बडी ही **खुषखबर** सुनाने आयेहैं !

**नर०**—का—का—? का **भंगकी गठरी** बांध ल्यायेहो मिय्यां जू ! याहितें खुसखबरी और कौन ससुरी होतीहै ?

**आस्मा०**—क्यौ न हो ! भई **नरसिंघ** ! भंगके भगत—एक तुमही हो ! जो तुझे **भंगही भंग** सूझती है ! पर भैया!—मै वह खुषखवर लाया हूं—कि जिस्के सुन्तेही तुम **भंगको** भी **भूल दंग** हो जावगे !

**सर्व**—का कहत हो !—तो बडही अचंबा है !

**आस्मा०**—अजी इस दुनियामें उस्से बडी कोई चीज ही नहीं ?

**सर्व**—तो फिर काहे कहित नाहीं ?

**आस्मा०**—तो सुनियोः—"बाप बडा न भैया—सबसे बडा रुपैय्या" ! वह **रुपैया** चाहिये तुमको ?

**सर्व**—मिय्यां रुपैया किसे न चहिये ? कहो कहांपैहैं?

**गुरु०**—वही कमाने के खातिर तो हम **हिन्दुस्तान** पुन्नवान देस छोड, चांद अस मेहरिया छांड—या **दक्खिन** पापिन माँ आन बसेहैं ! कहो मिय्यां कहो.

**आस्मा०**—अरे भई—कुछ ठंडाई भी पिलावगे कि नही ? मारे गर्मीके सारा तनबदन उबल गया ! (एका लो-

त्यांत भांग देतात ती पीत पीत) देखो भैया! तुम लोग गार्दियोंके **नायक**—याने ओहदेदार हो! इसवास्ते तुमको जियादः शऊर रखना चाहिये!—

**सर्व**—अलबत्ता! हम का नंगे नाचितहैं? सऊर तो जरूर राखित हैं!

**आस्मान०**—तो तुम सब ओहदेदार मिलजुलके—चुपचाप—जमादार साहब—**सुमेरसिंघजी**के मकानपर, आज आधीरात को आइयो—वहां तुमको सब हाल सुनाया जायगा—पर हां—इतना तो कहे देता हूं कि तुम लोगोंको दो दो हज़ार रुपैया इनाम मिलेगा—अगर कार करोगे तो—

**गुरु०**—दुई दुई हजार—रुपैया—एक एकको—मिलैहैं? का हम सपनामाँ तो नाहिं न? येहिका नाम **"खुसखबरी"**! अरे भाय! फिर का चहिये—दुई हजार पाये पर हमतो अपनी प्यारीकहं मिलब जैहैं हिन्दुस्तान!

**आस्मान०**—हां—हां—दो दो हज़ार रुप्पै—एक एक नायक कों मिलेंगे—लेकिन वैसे ही कार करने पडेंगे भैया!

**नर०**—अरे मियां—"कार कार" का पुकारत हो? जान तक दैबे को हम लोग तय्यार हैं!

**खड्ग०**—(हातीं तरवार घेऊन) यह खडगबहादुर हम काहे बांधित है तो? कार ही करन को न? **आल्हां** मा कहिन है—"की सिर लोटे रे धरतीमाँ—की सिर माटि गरद मिलि जाय"!

**आस्मा०**–**शाबाश खड्गबहादुर !** इसी का नाम "**जवांमर्दी**" ! अच्छा तो हम रुखसत होते हैं ! अब फुरसत नहीं–लेकिन भाई ! भंगकी तरंगमें बकबक करना मत कहीं–चुपचाप चले आना वहीं–भला ?

**नर०**–हां हां मियां, हां भला ! तुम का–हमका **भंगी** समझत हो ?

**आस्मान०**–(हंसून) नही भई ! तुम कैसे भंगी ? अजी तुमतो **जंगीजवान** ! (हंसत जातो.)

---

## अंक चौथा.

### प्रवेश ३ रा.

**स्थळ**–शनवारचा वाडा–एक सोपा.

वेळ–संध्याकाळ.

( **चांपाजी** टिळेकर हुजऱ्यांचा नाईक–टेहळतो आहे.)

**चांपाजी०**–( आपल्याशीं. ) शिव शिव ! काय हें पाप ! हे माय धरणी ! हो दुभंग ! आणि टाक गिळून ही पापी दुनया ! जिथें इमान नाहीं–तिथें आहे काय ?–**मसाण** ! हिंदुस्थानी लोक–बडे इमानी समजून त्यांस–बहुत विश्वासाच्या–बहुत नाजूक ठिकाणच्या–असाम्या आजलग मिळत आल्या–ह्मणूनच आमच्याही **श्रीमंतांच्या गिर्दे–गारदी** बनले ते ! पण तें **इमान**

आत्तां कुठें राहिलें आहे! खुद्द यजमानाची ही **मान** कापण्यास **सिद्ध** झाले ते **बेमान** !! तसेच आह्मी हुजरे- **हुजूरचे बंदे-सदा बंदगींत हजर** असणारे-**हुजूरवर** हत्यार उपसण्यास तय्यार झालों !!! हा मोठाच अचंबा नव्हे काय !-कदाचित् **गारदी** हे परदेशी व हुजरेही परकेच-लालचीच्या फेऱ्यांत पडून फिरतील! पण जे एका रक्तामांसाचे-तशांत **जातीचे ब्राह्मण**-हाय हाय ! **श्री-मंतांच्या** घराण्यांत ज्यांचा **जन्म** !-त्यांनीं-**श्रीमंतीच्या** लालचीनें-**राज्याधिकाराच्या** लोभानें-प्रत्यक्ष आपल्या सख्ख्या पुतण्याच्या जिवाचा **घात** करायास-तय्यार व्हावें यास ह्मणावें तरी काय ?-दुनयेचा अंत-अर्थात् **प्रळय** ह्मणावा-झालें ! पण अरे चाप्या !-अस्सें ह्मटल्यानें सुट-लास का तूं ? चल-पळ ! खुद्द आपल्या धन्यास गांठ-अन् कळीव सारी हकीकत ? आज-आत्तांच मला जी बित्तम बातमी-माझ्या दोस्तानें वानवडीहून मुद्दाम येऊन कळविली आहे ती खोटी तर नाहींच-कारण त्यानें ज्या खाणाखुणा सांगितल्या-त्या साऱ्या मला पटल्या-तर च-लावेंच आत्तां-एक पळ देखील व्यर्थ जाऊं देतां कामा नये-(जातो.)

---

# अंक पांचवा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—शनवारचा वाडा—गंगाबाईचा रंगमहाल.

**वेळ.**—तिसरा प्रहर.

( **गंगाबाई** सचिंत बसली आहे. )

**गंगा०**—(आपल्याशीं.) कोणत्या कुमुहूर्तावर—**गादीवर** बसणें झालें बाई! एक दिवस तरी सुखाचा जायचा होता त्यानंतर! काय—अशालाच ह्मणतात **श्रीमंतीचें सुख**?—आणि **राज्याधिकाराचा बडेजाव**? हाय हाय! ज्या **नांवाच्या सुखांत** जिवास खरें **सुख** ह्मणून नाहीं तें नाहींच!—पण उलट जिवास अपाय होण्याची क्षणोक्षणीं—पदोपदीं—धास्ती तें **सुख कसलें**! लोकांला बरीक दिसायला—दुष्टांचे डोळे फुटायला—मोठें **सुख**! पण—या सारखें दु:सह दु:ख दुसरें नाहींच! पण अस्सें ह्मणावें तर—**श्रीमंती** आणि **राज्याधिकार** हीं का कोणीं भोगिलीं नाहींत?—का कोणी भोगीत नाहींत?—कैकांनीं भोगिलीं!—आणि कैक भोगीत आहेत सुखासमाधानानें! तर मग हा आमचाच भोग ह्मणायचा! हेंच खरें!—ह्मणूनच ती आमची **सासूबाई**—नव्हे पूर्वजन्मींची पुरी **वैरीण**—हात धुवून लागली आहे आमच्या पाठीस! शिव शिव! आत्तांच तो एकमात्र

**विश्वासू**—चांपाजी नाईक—रडून गागून गेला कीं:—
"संभाळा बाईसाहेब! आजची बाणी कठीण आहे!—
आजच ती डाईण आपला डाव साधणार आहे!—आ-
जच हो आजच ते गार्दी गर्दी करणार आहेत या दुर्दैवी
वाड्यांत! आज धनीसाहेब पर्वतीवरच राहतील तर
बरें—नाहींतर—हर हर! त्यांच्या जिवावर गुजरणार आहे
हो खास!" ही प्रलयवाणी कानीं पडतांच मी त्याला
तिकडेच पिटाळलें आहे. बहुतकरून तो स्वारीस इकडे
येऊं देणार नाहीं! (इतक्यांत **नारायणराव** येतो त्यास पाहून—
छाती बडवून) हाय हाय! घात झाला ग बाई घात!—
डाइणीनें पुरा डाव साधिला ग बाई! (**नारायण**रा-
वाच्या तोंडाकडे पहात) चांपाजी नाहीं का भेटला वाटेंत?
चुकामुक झाली वाटतें! शिव शिव! (धाडकन् जमिनीवर
अंग टाकते.)

**नारा०**—(लगबगीनें तिला सांवरून धरून) लाडके! अ-
जूनही तूं शुद्धीवर नाहींच आलीस अँ?

**गंगा०**—अहो, मी किनई—शुद्धीवरच आहें बरें! पण
इकडची बरीक शुद्धि गेली! बुद्धि फिरली! (कपाळ बडविते.)
ह्मणूनच ग बाई—ही कुबुद्धि आठवली इकडे येण्याची!

**नारायण०**—ह्मणजे! आह्मीं आपल्या रंगमहालींही
येऊं नये?

**गंगा०**—अहो, पण हा अत्तां आपला रंगमहाल

नव्हे! हा—**कालजाल** आहे!—हें नाहीं का कळलें अजून? चला! निघा! क्षणभरही इथें राहूं नका! दगा—आहे दगा इथें!!!

**नारा०**आतां मात्र वेड लागलें खास तुला!—कालच्या तुझ्या कुस्वप्नापासून तूं शुद्धीवर ह्मणून नाहींच आलीस! तुला साऱ्या जगांत दगाच दगा दिसतो आहे! (तिच्या हनुवटीस हात लावून) प्रिये, तूं शहाणी असून अस्से वेडे चार काय करतेस बरें? तुझी काल सारी रात्र किं ग समजूत केली! ती फुकंट गेली ना? अग, **स्वप्नें** कुठें खरीं होत असतात? चल ऊठ तर! ही भीतीची जागा सोड!—आपण तुझ्या त्या आवडत्या हिंदोळ्यावर जाऊन झुलूं? मग तर झालें ना?—पण आज अंकीं बसलें पाहिजे ह्मटलें हो! (हंसून तिची हनुवटी धरून हालवितो.)

**गंगा—०**शिव शिव! ही का विनोदाची वेळ आहे? अहो, आतां तरी—या अंकित दासीची—ही एकच विनंति ऐकावी ह्मणतें—ती हीच:—चला! निघा! पळा इथून!—अत्तांच्या अत्तांच! चांपाजीनें नाहीं का कळविली ती भयंकर खबर?

**नारायण०**—अस्सें—अस्सें. आतां आलें लक्षांत! एकूण चांपाजीबुवांनीं इथेंही मुखरस पागळला तर! हीं जुनीं—थेरडीं कुचकामाचीं माणसें—भयंकर बाता उडविण्यांत मात्र भलीं बहाद्दर! जिथ्थें—तिथ्थें त्या थेरड्याच्या

अशा बाताः—" दगा होणार आहे "! " दंगा करणार आहेत "!—"गारदी बिथरले" !—"हुजरे फितरले ! ! " पण बेट्याला हें कळेना, कीं आपलेंच शिर फिरलें ह्मणून! काय करावें—वडिलांचे पदरचा पडला जुना नौकर !— नाहींतर कधींच बडतर्फ केला असता गुलामाला ! असल्या त्याच्या डराऊ बाता ऐकून आह्मी देखील भ्यालों एकदोनदां!! आणि करविला तपास बाबांकडून—पण तिथें काय इह्मा ! सब झूट !!!

**गंगा०**—( कपाळावर हात मारून ) तर फुटलें कपाळ हें ! जी भयंकर खबर शहरभर पसरली आहे ती ह्मणे झूट ! यालाच ह्मणतात ग बाई—

" विनाशकाले विपरीतबुद्धिः " !

**नारा०**—तर अशी " भयंकर खबर शहरभर पसरलेली " बाबांनीं नसती का कळविली आह्माला ?

**गंगा०**—हाय हाय ! काय हा मतिभ्रम ! साऱ्या पुण्यांत काय तो एक **बाबा** सांगेल तें **प्रमाण** ! बाकी " सब **झूट** "! बाबा! कायरे बाबा ही **भूल** घातलीस तूं ! ( **चांपाजीस** येतांना दुरून पाहून ) आला बिचारा ह्मातारा—धापा देत—जीव टाकीत—पुन्हा ! हाय हाय ! आले वाटतें गार्दी—अत्तां काय करूं बाई ! ( रडते. )

**नारा०**—( उपहासानें ) यावें ह्मटलें चांपाजीबुवा ! आणली का आणखी—ताजी लोणकडी ? मघाशीं कीं हो—

लकडीपुलाजवळ—लकडा लावून चुकलांत! तोंच पुन्हा आपली ती **आवडती रड** घेऊन,—धडपडत येऊन गांठलेंत इकडेही? शाबास!

**चांपा०**—(हात जोडून) महाराज! हें धड पडे तोंपर्यंत अशीच धडपड रड चालायची या रड्याची! तर आणखी घडीभर—कदाचित् पळभर—पुन्हा तीच रड—ऐकून घ्यावी-च सरकारांनीं! नंतर ती—**अविंधी** सुरू झाल्यावर—**सा-रीच रडारड—बोंबाबोंब**! मग कोण कुणाचें ऐक-णार!!! थेरड्या चांप्या! तुझ्या **धडपडीचें रडीचें** योग्य चीज केलेंच अखेर—तुझ्या **जवान धनीसाहेबांनीं**! "**शाबास**" ह्मणून!! हरहर! आजकाल सच्याचें मरण आणि लुच्याची मजा आहे!

**नारा०**—(चपापून) चांपाजीबुवा क्षमा करा—आपण वडिलांचे ठिकाणीं आहांत—मला आत्तां! खरेंच कीं काय मजवर धाड पडणार? तर **बाबा** नसते का आले धां-वत—? **नाना, बापू** तरी कसे स्वस्थ बसते!

**चांपा०**—सरकार! स्पष्ट बोलण्याबद्दल माफी असावी! आपले **बाबा** आहेत स्वर्गलोकीं—इथें येतील कसे? त्या तों-डपुज्या **बाबाजीस** आपण **बाबा** समजून—त्याजवर भरंवसा ठेवून—जर बेफिकीर बसलां असाल—तर सफाई बुडालांत! तो **मतलबी यार**!—असल्या काटाकाटींच्या प्रसंगीं मुळीं-च तोंड दाखविणार नाहीं. व ते दीडशहाणे **नाना, बापू**

ही येणार नाहींत !—कारण आपण त्या **बाबाचें** ऐकतां—त्यांचें ऐकत नाहीं ह्मणून! हरहर! ऐशा वक्तीं—त्या शहाण्यांच्या कांद्यांनीं—अस्सें करणें—हें त्यांच्या **नांवाजलेल्या शहाणपणाची राखरांगोळी** करीत आहे! हाय हाय! कोण ही **बेपरवा** !—कसल्याही गुप्त बातम्या लावण्याचा ज्या **नानाचा** बाणा !—व त्याजवरूनच ज्याला **कर्णपिशाच** साध्य आहे—अशी लोकांची समजूत !—त्या **नानास** शेंकडों **हुजुरे**—आणि हजारों **गारदी** बिथरल्याची वार्ताही नसणें—हें नवल नव्हे काय ! ही मुद्दाम केलेली डोळेझांक !—त्यास खरेच **डोळे झांकायला** लावील ! असो. तर महाराज ! आतां तरी पडावें बाहेर—अस्सेंच—

**नारा०**—आणि अस्सेंच जायाचें कुठें हो चांपाजी ? आहे का एखादें अस्सें **निर्भयस्थान**—कीं जिथ्थें—त्या मांगांचा शिरकाव होणार नाहीं ? शिव शिव ! कोण माझा मूर्खपणा हा !

**चांपा०**—अहो सरकार !—कुठें तरी दडी देऊं चला-च!—"प्रयत्नीं परमेश्वर"! (इतक्यांत वाड्याखालीं दंगा होतो तिकडे कान देऊन व खिडकींतून डोकावून )आले—आले!—तेच!—गारदीच मादर—हरामी—हरहर ! प्रसंग आलाच आखर !

**नारा०**—( घाबरून ) तर भरलीं ह्मणायचीं आमचीं शंभर वर्षे ! ( पहाऱ्यावरील नाईक येतो त्यास पाहून ) कसली गडबड चालली आहे हो खालीं नाईक ?

**प० नाईक०**—(बोबडी वळलेली असतां) सससर—कार ! गागा—गारदी शिरले आमंदी ! दिदि—दिल्ली दरवाजा—फोफो—फोडला ! मामा—मार कत्तल—उडवलिया खा—खालती व—वरती—येऊं—पहात्याती—

**गंगा०**—(किंकाळी फोडून) ज्या दत्तास भित होतें तेंच आलें पुढें ना ? चांपाजीबुवा—तुह्मी—या वेळीं आमचे बापाहून बाप आहांत हो !—वांचवा हो वांचवा !—माझ्या—(**नारायणरावा**च्या गळ्यास घट्ट मिठी मारून रडते.)

**नारा०**—लाडके—अशी रडूं नको ! चांपाजी ! खरेंच काहो मजवरच हत्यार धरून आले आहेत हे बदमाष ? मलाच का मारणार ?

**चांपा०**—अजूनही का संशय महाराज ? हर हर ! कोण हा अल्लडपणा ! **रुखिणी** आनंदी ! अशा अल्लड **बच्च्याच्या** जिवावर तुझा घाला !

**नारा०**—शिवशिव ! कोण माझा मूर्खपणा हा ! अजून मला वाटत नाहीं, कीं **आनंदीकाकू**—माझ्या जिवावर उठेल ह्मणून !—यालाच ह्मणतात **काळाचा फेरा** ! असो.—तर चांपाजीबुवा, आतां इथून पळायची देखील वाट खुंटली ना ?

**चांपा०**—नाहीं! अजूनही आहे एक **वाट**! एक **चोरभुयार**—अशा प्रसंगासाठींच तय्यार केलेलें—आहे मला माहीत ! चलावें—मी नेतों हातीं धरून त्यांतून ! करावीच छाती !

**नारा०**—छे बुवा ! आपली नाहीं होत छाती !—तसल्या पडित भुयारांत शिरायची!—गुदमरून मरेन मी !

( इतक्यांत जिन्याच्या दरवाज्याला गारदी धक्के मारतात. )

**चांपा०**—ऐकावें! गार्द्यांनीं केली गर्दी! फोडताहेत दार!

**नारा०**—तर उघडा तें दार बेलाशक ! ते बदमाष ह्मणतात काय तें ऐकूं तरी ! कदाचित् धरायला आले असतील मला! पण—इथें आतां—ही उपयोगी नाहीं ( **गंगाबाई**ला पोटाशीं धरून ) लाडके !—तूं येथून—आतां—चल कशी—!सुटलों—तर—भेटूं पुन्हा! नाहींतर—हीच—**शेवटची**!

( सद्गद होऊन स्तब्ध होतो. )

**गंगा०**—( मोठ्यानें रडून ) काय ? हीच—**शेवटची** ? छे छे ! अस्सें कस्सें होईल अघटित ? ते गारदी तरी— माणसेंच आहेत ना ? मग माणसांच्या हातून—तें **राक्षसी कर्म** होईल कस्सें हो ? मनुष्यमात्रांत दया ह्मणून असायचीच !

**नारा०**—( तिला नखशिखांत निरखून पाहून ) विधात्या! काय हा तुझा अविचार ! असली **अलौकिक सुंदरी**! **प्रेमाची शुद्ध मूर्त्ति**!! **केवळ सद्गुणांची खाणी** !!! मज सारख्या अभाग्याच्या—अल्पायूच्या—पदरीं बांधून, तिची **माती** किरे केलीस तूं ! ( गहिवरून ) प्रिये ! सोड या **निर्दयास** ! हो बाहेर ! आले काळ आंत !

**गंगा०**—( हंबरडा फोडून ) काय ह्मटलेंत ? "बाहेर हो"? हाय हाय ! अशी कोण चांडाळीण असेल बाई—कीं जी

अशा समयीं आपल्या **पंचप्राणांजवळून** दूर होईल ? अहो, आतां मी प्रत्यक्ष काळालाही भिणार नाहीं ! खुशाल येऊं द्या ते मारेकरी— त्यांस हात जोडीन—त्यांच्या पायां पडेन—त्यांना नानाप्रकारें विनवून—सोडवून घेईन ह्मटलें हे माझे **पंचप्राण** ! कदाचित् त्या **पाषाणहृदयांस दया** नच आली तर—मरेन आपल्या **प्राणनाथा** बरोबर ! (त्याच्या गळां पडून) मागें राहून मलाहो करायचें काय मेलें ? करूं द्या त्या कृत्येसच **"निष्कंटक राज्य"** ! (रडते.)

**नारा०**—पण प्रिये, जे धन्यावर हत्यार धरून येणार, ते तुजवरही कशावरून हात टाकणार नाहींत ?—तो— तसला **अपमान**—तर माझ्याच्यानें नाहींच सहन होणार ! ! अगे, **स्वर्गांत** देखील—त्याच्याबद्दल **खुमखुम** लागून राहील मला ! करितां—प्राणप्रिये, माझी ही शेवटची आज्ञा—नव्हे विनंती—ऐकच आतां—(सजल नेत्र होत्साता सद्गदकंठानें) लाडके, हवें तर—या पलीकडच्या खोलींत जाऊन बैस—दार बंद करून घेऊन—ह्मणजे इथलें सारें दिसेल—त्या गवाक्षांतून—बघवेल तर !—तर चल हो खोलींत—(तिचा हात धरून तिला खोलींत लोटतो—तें पाहून चांपाजी जिन्याचें दार उघडतो—तोंच **सुमेरसिंहा**सहित गारदी लोक आंत घुसतात—**सुमेरु** लवून मुजरा करून खालीं मान घालून उभा राहातो. त्यास पाहून) वाहवा ! काय ही **देवाची दया** ! हे तर आमचे **सच्चे—विश्वासू !—पुरे इमानी!—खरे खानदानी !—स्वामिभक्तिपरायण रामभक्त-**

**शिरोमणि सुमेरसिंगजी !!!** यांच्यापासून तर आमच्या केशासही धक्का लागणार नाहीं—यांत तिळमात्र संशय नाहीं ! यावें जमादार ! बसावें इथें—यावर—( हातानें दाखवितो.)

**आस्मा०**—( हंसत ) क्यौ न हो ! इसे ही कहते हैं **चिकनी चुपडी** !

**सुमेरु०**—( आदबीनें ) महाराज !— छमा कीजिये !— ( हात जोडतो.)

**नारा०**—अहो. अपराध्याला क्षमा ! तुह्मी तर निरपराधी ! कृपा करून खरें सांगा—हा दंगा कशाकरितां ?

**सुमेरु०**—महाराज ! मै क्या कहूं ? आपको तो सब हाल मालूम ही है !

**नारा०**—जमादार ! मलाहो कसें मालूम ?

**आस्मा०**—अजी सरकार ! आपको कैसे नहीं मालूम? आज छः महिने हो चुके—हम लोगोंको तनखाह नहीं पहुंची ! लडके बाले खुदाके हवाले करबैठे हैं !—मारे भूखोंके मररहे हैं ! मगर **हुजूर** तो गुलछर्रें उडा रहे हैं ! क्या अंधेर है ! ! !

**नारा०**—जमादार! हे बडेमियां काय बडबडताहेत हो? "गुलछर्रें" ते कसले ? आणि "अन्धेर" तो काय ? त-**नखा** पोहोंचली नसेल तर आत्तां देववितों ! उशीर काय? मग तर झालें ना ?

**आस्मा०**—अजी सरकार झ्याला क्या ? वो वक्त

गेला! "अब पछताये होत क्या—जब चिडीया चुग गई खेत"! अब राम राम सुमरके—बैकुंठ धामको सिधारिये-बस हो चुका! सब कुछ झ्याला! (समशेर उगारतो.)

**नारा०**—जमादार, तुह्मी विद्यमान असतां— या यःकश्चित् **यवनानें** मला इतकें टाकून बोलावें काय? तलवार देखील उगारावी?

**गंगा०**—(एकीकडे.) शिव शिव! काय हा दुर्धर प्रसंग बाई!

**सुमेरु०**—महाराज! इसेही कहते हैं—"समयका हेर फेर"!

"समय समय की बात—**बाज**पै झपटै **बगुला**"! अब यह—(आपल्याकडे हात करून) बचनका हारा—मतिका मारा—क्या कर सकताहै **बेचारा.**

**नारा०**—तर मी अन्यायानें मरावें हें तुह्माला बघवतें काय? अहो, कांहीं तरी न्याय करा, ह्मटलें **न्याय!**

**आस्मा०**—क्या बात है! जब आन पहुंची—तब न्याव की सूझी! इतने दिन वह **न्याव** किस **गांव**में था जी? अपने ही **चचा चर्ची** पर इतना **अन्याव**—खुद आपनें क्यौं किया फिर?

**सुमेरु०**—हरेराम! महाराज! न्याय अन्याय की न पूछिये मुझसे! आपकी जानपै आन पहुंची है सच्च!

**नारा०**—हाय हाय! हीच का रामभक्ताची राजभक्ति!

जमादार, तुह्मी आमच्या **रखवालदारां**वरील मुख्य **सरदार** ना ?—अर्थात् या **ब्रह्मबालकाचे प्राणांचे र-क्षक** ना ? तर तुह्मीच याच्या **प्राणांचे ग्राहक** बनून आलांत काय ? **बालहत्या—ब्रह्महत्या—स्वामिहत्या**—या **हत्यात्रयपातकां**चा जबाब तुह्मी आपल्या **रामापुढें** काय देणार ? जन्मभर रामभक्ति केली ती अशी— द्रव्य-लोभांत बद्ध होऊन व्यर्थ घालवितां ? **रौरवनरकप्राप्ति** करून घेतां ?

**सुमेरु०**—हरेराम ! "करमगत टारेहू न टरै" कहते हैं सो सच्च है ! अब तो यहां—"भइ गति सांप छछुंदर केरी" ऐसी आन बनी है !—

**नारा०**—तर तुह्मी जाणूनबुझून चंडालकर्म करतां काय ? अहो अजून ही तुह्मी **परमशुद्ध** आहां ! "हरे-राम" हा परम पवित्र मंत्र तुमच्या मुखांतून सदा उच्चा-रला जात आहे !—तर "हें चांडालकर्म मी करीत नाहीं" असें ह्मणा ह्मणजे झालें !

**सुमेरु०**—हरेराम ! अब **"नहीं"** करते बनती नहीं—क्यौंकि हम **बचनहार** चुके हैं—कहा है—"प्राण जाहु बरु बचन न जाही."

**आस्मान०**—(नारायणरावास ) वाह ! हुजूर वाह !—जब आप ऐसेहैं—तबहीतो पापपुन्नको हज़म कर बैठे हैं ! अजी बच्चाजी ! बचन हारके—"नहीं" करना यह कमीनों-

का काम है—कुलीनोंका नहीं ! अब ज़ियादः बकबक मत कीजिये—टुक रामनाम लीजिये— बस होचुका ! ( जमादाराकडे पाहून ) क्यौं साहब ! है न अब हुक्म ?

**गंगा०**—( एकीकडे धावरून ) कशाचा हुकूम मागतो आहे हा मांग बाई !

**सुमेरु०**—हरे—राम ! अब काहेको हुकुम !

**आस्मा०**—सच है ! अब काहेका हुकूम ! हुक्म तो आप देही चुके हैं ! फिर अब देर क्यौं ! ( गारद्यांस हाका मारतो ) मियां अबदुर्रहीम ! भाई शाहबुद्दीन ! भैया गुरदत्त ! खडगसिंघ ! नरसिंघ ! जयमल्ल ! हुशियार ! खबरदार! तय्यार हूजियो! (गारदी तलवारी उगारून हुकुमाची वाट पहातात).

**नारा०**—( आपल्याशीं. ) शिवशिव ! या महापाषाण पठाणाला कुठली दया ! तर याला दरडावून तरी पहावें ! ( उघड. ) खबरदार! दूर उभे राहा ! तुह्मी मला कोण समजलांत ? कोणाच्या हुकुमानें तुह्मी आमची जान घेण्यास आलांत ? अरे बदमाषांनो, कोण हा अविचार !

**आस्मा०**—चुप रह बदमाष ! क्यौं नाहक जान खाता है ? अबे तुझे तेरेही काका काकीके हुक्मसे जहान्नुम में भेजते है हम ! समझा कमबख्त !

**नारा०**—शिवशिव ! मीच कमबख्त—बदमाष अँ ?

**सुमेरु०**—मियां ! इतने बदलिहाज़ मत हूजियो ! कुछ तो मुलाहिज़ः कीजियो ! ये कौन हैं ?

**आस्मा०**—इस कस्साईसे अब मुलाहिज़: ? तो फिर यह बच्चा हमारे बच्चेबाले कलही कटवायगा !

**नारा०**—कोण हा उन्मत्तपणा ! मी का कसाई ? अरे मांगांनो ! हा **रणबहादुरांचा बच्चा** आहे बरें ! मरणाला डरणारा नव्हे !

**आस्मा०**—( उपहासानें ) क्यौं न हो! लेकिन बच्चाजी ! जब तक हमारी शमशेर न चमकी—तबही तक तुह्मारी बहादुरी ! देख ले ( असें म्हणून **नारायणरावा**च्या अंगावर शमशेर उगारून जातो—तोंच चांपाजी जल्दी करून त्यास पळवितो व दार बंद करून घेतो हें पाहून ) क्या बद्ज़ात है यह **चप्पाजी पाजी** ! हमारी शिकारकों ऐन वक्तपै भगा लेगया भगोडा ! ( दांत ओंठ खाऊन ) अबे तेरी ऐसी तैसी करूं! बच्चा! तू क्या बचने पायगा अब! अबे कच्चा खाऊंगा तुझे! अच्छा अव्वल तेराही काम तमाम करूंगा—फिर तेरै **भग्गू** धनीका ! ! ( गारद्यांकडे पाहून ) सतपतालसे पकड लायंगे—जायंगे कहां वे भगुए भागके ! चलो भाइयो! देखें भला कहां गये हैं वे बदमाष ! ( जातात. )

**गंगा०**—( बाहेर येऊन सुस्कारा टाकून ) शिव शिव ! काय हा ईश्वरी गहजब ! ( मोठ्यानें रडत ) आतां मी कुठें जाऊं बाई ! कुठें बरें जाणें झालें असेल ? या गणेशचौकांतून गेले ते बहुशा मामंजीकडेसच गेले असावेत ! तर जावें आपणही तिकडेच ! आई **पर्वती** ! संभाळबाई आतां! !
( जाते. )

---

# अंक पांचवा.

## प्रवेश २ रा.

स्थल—शनवारचा वाडा—दादासाहेबांचे महालांतील एक दालन.

वेळ—तिसरा प्रहर.

(राघोबादादा सचिंत बसला आहे—व त्याच्याजवळ त्याच्या तोंडाकडे बघत आनंदीबाई बसली आहे.)

**आनं०**—पण आज मेलें अस्सें चिंताक्रांत होण्याला कारण काय झालें बाई ? अहो आजचा तर आनंदी आनंदाचा दिवस !

**राघो०**—असेल ! पण मला तर या दशदिशाही उदास दिसताहेत आज !

**आनं०**—तर मोठ्ठाच चमत्कार ह्मणायचा ! अहो आजच तर या जगीं जन्मास आल्याचें सार्थक होणार आहे !—राजाधिराजासही जो अलभ्य लाभ तो आपणास लाभणार आहे आजच ! आपल्या अपरंपार पुण्याईचें जें अमृतफळ तें आजच फळणार आहे ! तें चांडाळ मंत्रीमंडळ—दातीं तृण धरून आपणास शरण येणार आहे आजच ! ते शिंदे-होळकर—गायकवाड—भोंसले, पवारादि बडेबडे शिरजोर सरदार आपणापुढें हात जोडून खडे होणार आहेत आजच !!!

**राघो०**—तर मग—मला अशुभ शकुन कां झाला आज ?

**आनं०**—आपणास तो अशुभ वाटत असेल—पण तो शुभच असावा—कारण ती शकुनसृष्टि निराळ्या दृष्टीनें पाहावी लागते ह्मटलें ! प्रयाणसमयीं विद्वान् ब्राह्मण पुढें आला असतां अपशकुन !— आणि **विधवा** व्यभिचारिणी आडवी आली असतां शुभ शकून ! ! (हंसून) तर आपला अशुभ शकून असाच असावासा वाटतो !

**राघो०**—अगे, इतकें कां मला कळत नाहीं ! आज पूजा करीत असतां हातून निरांजनदीप सुटून पडला आणि विझालाही.

**आनं०**—(हंसून) अस्सें **काय** ? तर त्याचा नेमानेमच तितकाच !

**राघो०**—ह्मणजे काय ?

**आनं०**—ह्मणजे आपल्या शत्रूचा जीवनदीप मालवला ह्मटलें !

**राघो०**—ह्मणजे ? असा आमचा शत्रु कोण ?

**आनं०**—दुसरा कोण ? आमची गादी बळकावून—आह्माला नजरबंद करून—साऱ्या पेशवाईंत अंदाधुंदी माजविणारा तो **बेबंद—कारटा** !

**राघो०**—आमचा नारायण ! त्याला कोणीं मारलें कीं काय ? अगे, हें आहे तरी काय ? स्पष्ट स्पष्ट सांग !—त्याला

धरायचें आहे-मारायचें नाहींच ! तो शत्रुग कसला? तें तर आपलें-या निपुत्रिकांचें एकुलतें एक मूल !

**आनं०**-होयहो ! मूलच तें! पण मूल जर आडवें आलें-तर नको का तें कापून काढायला ?

**राघो०**-अग दुष्टे ! त्यालाग कोण कापूं शकणार ?

**आनं०**-अहो मी तर दुष्ट खरीच-पण तो सुष्ट-त्या कडव्या लोकांस आडवा गेला-तर ते त्याला तोडल्याशिवाय सोडतील काय ?

(इतक्यांत नारायणराव धांवत येतो हें पाहून आनंदीबाई पडद्याचे आड जाते. )

**नारा०**-( धावरून ) का-का! कां हो मला कापवितां ? मी हो काय तुमचा असा घातपात केला ? तुमचा मी पुतण्या-पुत्रवत्‌च ना ? **माधवराव दादांनीं** मरतांना तुमच्या ओट्यांत मला घातलेंन्‌ ना ? तें अस्सें मारेकऱ्यांकरवीं मारवायला का ? काका ! हा अनर्थ या पेशवाईच्याच पायीं ना ? तर अशी ही **पेशवाई** नको मला !-पुण्यांत राहात नाहीं मी !-असाच जातों काशीयात्रेस-आत्तांच निघून ! पुन्हा मी ह्मणून या पुण्यांत-नव्हे पेशवाईच्या हद्दींतही, पाय देखील ठेवणार नाहींहो ! ( इतक्यांत **गंगाबाई** येऊन लपून आड उभी राहते. )

**राघो०**-अरे बाळा, तुला कोण चांडाळ मारताहेतरे ? असारे काय घाबरलास ? घामानें चिम्म किंरे झालास ! ( आपल्या अंगवस्त्रानें त्याचें अंग पुसून ) बाळा ! तुला मी का मा-

रवीन ? अरे, तूंच एक या पेशवाईचा खरा वारस! मालक! माझा जीवप्राण!

**नारा०**—ह्मणूनच माझ्या प्राणावर बेतली आहे! ते गारदी मारताहेत मला ठार! तुमच्याच हुकुमानें ना?—

**राघो०**—माझ्या हुकमानें आणि ठार मारताहेत तुला? कोठें आहेत ते झूटे!—बदमाष!

**नारा०**—येताहेत इकडेच ते यमदूत! आलेच! भिडलेच! हे पहा!

(गारदी येऊन गर्दी करतात.)

**राघो०**—(गारद्यांकडे रागावून पहात) अबे बदमाषों! यह क्या करते हो तुम? किस्को मारते हो? ये तो तुह्मारे खाविंद—मालिक पेशवा सरकार **नारायणराव साहब** न? हटो पीछे! निकलो यहांसें! **बेवकूफ** कहींके! अपने खाविंदपर हथियार!

**आस्मा०**—(आवेशानें पुढें सरून) क्या कहा हुजूर? हम लोग—हुक्मबर्दार क्या बदमाष ठैरे इस **अंधेर नगरीमें**?

**राघो०**—तो क्या तुमको **नारायणराव साहबको जानसे मारनेका** हुकुम है? क्या तुम होषमें हो मियां? (**सुमेरसिंहा**कडे पाहून) क्यौंजी जमादार! यह क्या करतेहो? किस्के हुकुमसे तुम अपने **मालिकका खून** करतेहो?

**सुमेरु०**—हुजूरहीके हुकुमसे! नहीं तो हमको क्या पडीथी? हमको **पेशवा** थोडेही बन्ना है?

**रावो०**—(रागानें.) बस—बस ज़ियादः मत बको! हुकुम बतलाओ—वह हुकुम!

**सुमेरु०**—(आपल्या खिशांतून काढून) यह देखिये हुकुम!

**राघो०**—(तें पत्र मनांत वाचून आपल्याशीं.) शिव! शिव! शिव! काय हा अर्थाचा **अनर्थ**! पूर्वी—पुराणांतरीं—त्या **विषया** नामक प्रधानकन्येनें "**विषास**" "**विषया**" करून—आपल्या पित्यास फसवून—आपलें कार्य साधून घेतल्याची कथा आहे! पण त्यांत तिचा हेतु स्तुत्य होता. पण यांत—(कागदावर हात मारून) आमच्या **कृत्या पत्नीनें** "**धरावा**"स "**मारावा**" करून—या मूर्ख पतीस अधोगतीस लावण्याची कृति केली! आतां मी या आज्ञाधारक शूर शिपायांशीं कोणत्या तोंडानें बोलूं? असो आपल्या मूर्खत्वाचें कृत्य निस्तरावें आपलें आपणच! (उघड.) भाइयो! यह बडेही अचंभेकी बात हुई—मैनेतो "धरावा" लिखाथा "मारावा" नहीं! धरावाको "**मारावा**" किया किसनें कौन जाने! खैर—हुआ सो हुआ! मगर इतना अच्छा हुआ—कि तुम लोग इस **ब्रह्मराज**कुमारको मारनेके आगेही—यहां आन पहुंचे! नहींतो बडाही **अंधेर** हुआ होता!—**महाप्रलय** मचजाता! यह **धरित्री** धस गई होती **पताल**में और तुम लोग पडे होते **नरककुंड**में!!! यह **बंबभोला**नें बडी ही दया की! तुमको

सुबुद्ध दी! तो जवानमर्दो ! चलो चुपचाप अपने अपने बेडोंपर !— तुम आज बडेही पापसे बचे ! ! !

( गारदी विचारांत पडून एकमेकांत कुजबुजताहेत. )

आनं०—( आडून आपल्याशीं. ) हाय हाय! हा कपिला-षष्ठीचा योग !— हा दुर्लभ राजयोग !—या या आनंदीनें आणलेला ! हा हा—मतिभ्रष्ट घालविताहे याला ह्मणावें तरी काय ? शिव शिव ! असल्या नृसिंहीस हा—गाईचा दादा—दादला ! दाद कुठें आहे त्या अंध देवाच्या धुंद दरबारीं ( दांतओंठ करकरा खाते ).

आस्मा०—(हात जोडून ) हुजूर उस पापसे बचे; लेकिन इस पापीचंडालसे कब बच सकतेहैं हम ? ये बचा बचा तो हमारे बच्चे बाले क्या बचने देगा ? अब तो ऐसी ही आन ठैरी है—कि ये बैरीही बचेगा या हमही बचेंगे !

आनं०—( एकीकडे. ) भले बहाद्दर पठाण ! आतां सु-मेरु पाशाण काय रडतात तें ऐकावें !

राघो०—क्या तुम लोग हमारा हुकुम मानते नहीं ? जमादार क्या तुम उस झूठे खतके धोकेमें आनेके आ-पने खाविंदकी जानके गाहक होतेहो ?

सुमेरु०—हरेराम ! क्या सचमुच वह खत झूठा ? तो हमारा करम फूटा !

“ दोनो दीनसे गये पांडे—हलवा मिला न मांडे”. ऐसी गति हुई हमारी !

**आस्मा०**—( हंसून ) उस्तादजी ! आप बडेही भोले भाले हो ! भला ऐसे वक्त–हुजूरनें और क्या कहना ! क्या अपने मुंहसे कहना—कि " काट डालो हमारे भतीजे-को"—!—और उसीके रूबरू !

**राघो०**—( रागावून ) चुप रह बदज़ात ! तैने कैसे जानी हमारे दिलकी ! चल निकल यहांसे ! हम तुझे जानते नहीं ! जमादार ! तुम मेहरबानी करकर अपने घरकी राहलो ! यह हमारा प्राण है ! हमारी जान गये बिना—इस्की जान न जाने देंगे हम !

**आस्मा०**—( जरा हळूच ) क्या बात है !—इसेही कहते है "मन भावे मूंड हिलावे" !

**आनं०**—( एकीकडे ) शिवशिव ! **कमाल झाली या हमालाच्या कम अकलेची** बाई !

**नारा०**—( सद्गद होऊन ) काका ! या तुमच्या प्रेमास उपमा आहे काहो ! आपण आपल्या प्राणांवर देखील उदार झालां अँ ! ( जमादाराकडे पाहून ) जमादार ! काकांच्या हुकुमानें का मारणार होता तुह्मी—या निरपराधी बालकास ! शिवशिव ! किती तरी अविचार—करणार होतां हो तुह्मी ! ! पण तो तुमचा **राम**—तें चांडाळाचें काम—तुमच्या हातून करवील कसा ! तर आतां तरी खातरी झालीना ! तर ठेवाच—या **पोरक्या—बालकाच्या** मस्तकीं आपला अभ-

यहस्त एकदांचा! ह्मणजे मी निश्चित झालों!! (त्याच्या पायांवर डोकें ठेवितो)

**आनं०**—(एकीकडे) आतां या भोगाला काय करावें बाई! हा भोळा शिपाई भाई—अभयवचन देऊन चुकला ह्मणजे पंचाईत! (खिडकींतून डोकावून रागानें) धिक्कार असो तुला आणि तुझ्या या नीच करणीला मेल्या कुळबुडव्या! अस्सें रडून—भलत्यांच्या पायां पडून का घर घेतोस? तूं निरपराधी कुकू बाळना? तर आह्मांला—या वडिलांना बंदीवान करून त्राहि त्राहि करून कुणी सोडलें रे काळा? (जमादाराकडे डोळे वटारून) जमादार! तुह्मी सिंह ह्मणवितां—आणि अस्सें भग्गूबाई सारखें काय करता हो! कापा या मेल्या गळेकापूची मान! पठाण! कुठें गेलें तुमचें इमान—अवसान—? बघता काय तोंडाकडे! तोडा या कसायाची गर्दन!

**सुमेरु०**—(उपहासानें) छमा करो बाईसाहब! तुह्मारे सब छल बल अब जान पडे! पत्थर पडे हमारी अक्लपर! जो तुह्मारी सुनी— और खूनी बन आये अपने स्वामीका खून करनेको! हरे—राम! जो खामपारा अपने खसमके लेख पै मेख मारके—अर्थका अनर्थ करने न चूकी—वह चुडैल क्या न करेगी? इसेही कहते हैं:

“ तिरियाचलित्तर जानै न कोय
खसम मार कर सत्ती होय ” !

**आनं०**—आहारे **गंवारा** ! तुला या ( **राघोबा**कडे हात करून ) **नंदीपतीचें** बकणें खरें वाटलें ! आणि या (आपल्या छातीला हात लावून ) **आनंदी—सत्यवादिनीचें सत्यभाषण**—मिथ्या भासलें ! आणि त्यांत **स्त्रीचरित्र** दिसलें ! ! अरे भांग्या ! तुला आतां खरें आणि खोटें ठरवून तरी करायचें कायरे ? **बचनभंग** तर करायचा नाहीं ना ? — तुह्मी **दशरथवंशज वचनाचे** बडे **सच्चे**ना ? स्वप्नांत दिलेलें वचन देखील सत्य करणारा **हरिश्चंद्रही** तुमचा **पूर्वज**ना ? जर खरोखरच—**दशरथहरिश्चंद्रा**सारखे सत्यप्रतिज्ञ तुमचे पूर्वज असतील, व तुह्मी त्यांचे सच्चे **वंशज** असाल, तर आपल्या वचनास सत्य कराल ! **बेलभंडार** उचलून दिल्याचें स्मराल ! मराल पण "करीन" ह्मटलेलें करालच कराल ! ! !

**सुमेरु०**—हरे राम ! अब मैं क्या करूं? **सत**पर रहूं—तो **असत**का आसरा करना पडता है ! **सत छोडूं**—तो **पत** जाती है ! **पत** गई तो **जगत** गया !

**राघो०**—( सुस्कारा टाकून आपल्याशीं ) कोण माझा अविचार हा ! मी अंमळ—या कुत्येचा मिंदा होतांच—इनें मजवर इंगा फिरविला! उघड किंरे माझी निंदा करूं लागली ! ( उघड ) दुष्टे ! अशी **निंद्यतम** करणी करून ही—उलट माझीच **निंदा** करत्येस अं !—मला "**नंदीपति**" ह्मणतेस काय ? वाहवा ! काय हें **अपूर्व पद** आपल्या पती-

साठीं हुडकून काढलेंस तूं ! पण मला तें पुरवलें—आवडलें देखील ! खुशाल मी **"नंदीपति"** ह्मणवून घेईन ! —पण **आनंदीपति** ह्मणविणें मात्र—मला इतःपर **नरकयातनेहूनही दुःसह** होणार ! ! !

**आनंदी०**—(डोळे चढवून) तर ही **"निंद्यतम करणी"** आनंदीचीच काय ?—तें पत्र खुद्द आपल्या हातानें लिहितांना भांग झोंकली होतीत काय आपण ? (वेडावून) ह्मणे मी **"धरावा"** लिखाथा—**"मारावा"** नहीं ! अस्से **नंदी** आहां ह्मणूनच असे **बंदीवान** बनून बसलां आहां! असो. जर या **नंदीला** या **आनंदीचा** इतका कंटाळा ! तर या **आनंदीला** तरी कशाला हवा मेला या **बंदीवानाचा लळा** ! (आवेशानें) पठाण! पहातां काय ! तोडा या (राघोबादादाकडे हात करून) **वेड्याचे हे निंद्य हात** !—करा थोटा !— आणि छाटा या (नारायणरावाला दाखवून) **घेडाची मान**! अरे या **अबलेची अजब** करणी पाहून तरी कांहीं लाजा!—हें तोडलें बघा माझें **सौभाग्यसूत्र** मीं ! (मंगळसूत्र तोडून त्यांच्या अंगावर फेंकते) असल्या मेल्या **मळमळीत सौभाग्यापेक्षां—झळझळीत वैधव्य बरें** !

**राघो०**—(रागानें) अग रांडे ! कितीतरी तोंड सोडलेंस गे आज ! **मंगळसूत्र** देखील तोडलेंस अँ !

**आनं०**—**"आनंदी"** नांवास सोडचिठ्ठी मिळाल्यावर मग तें मेलें—काळें **बंदीवानाचें बंधन** हव्वें कशाला !

राघो०—(दांत ओंठ खात खात) अरेरे! ही स्त्री नसती तर—इच्या नरडीचा घोंट घेतला असता मी घोंट!

आनं०—(उपहासानें) हाय हाय! "स्त्री" नसतें मी! —तर काय न केलें असतें मीं! पण तो ठोम्या ब्रह्म्या चकला!— स्त्रीचा पुरुष आणि पुरुषाची स्त्री करून चुकलाहो चुकला!

गंगा०—(आश्चर्यचकित होऊन) काय हें नवल! जी कृत्या आपल्या सौभाग्यावरही लात मारायला चुकत नाहीं— ती अवदसा माझें कुंकूं पुसायला का कमी करील? तर सोडावा हा आडपडदा! (पुढें येऊन हात जोडून करुणवाणीनें) अहो रामभक्तजी जमादार बाबा! ही पहा— तुमची धर्माची कन्या आली आहे तुह्माला शरण! इला चुडेदान द्याहो चुडेदान! सर्व दानापरीस महादान! (त्याच्या पायां पडून सद्गद कंठानें) एवढी भीक—या अनाथ ब्राह्मणीला घालाचहो बाबा!

सुमेरु०—(आश्चर्यमुद्रेनें तिजकडे पहात) ओहो! क्या ये त्रिपुरसुंदरी परमेश्वरी हमारी आराध्य देवता श्री-जानकीजी प्रकट हुईहैं! या हमारी पूरब पुण्याई—मुझे उस चंडाल कर्मसे छुडानेके लिये मानवी बन आईहै! होनहो! यह कुछनकुछ दैविक चमत्कारहै!!! माताजी! आप क्या इस पापीके पांव पडती हो!

आनंदी०—(आपल्याशीं साश्चर्य) अग बाई! ही रंगेली

गंगी इथें कशी आली—अशा वेळीं! हा मेला देवभोळा देखील इला बघतांच पाघळला! मग बाकीचे शिपाई भाई तर उल्लूच—लोट पोट होऊन झुगारून देतील हत्यारें! तर इला घालिवली पाहिजे इथून झटपट (तेथें जाऊन तिला धिक्कारीत) आली का आपली धिडका इथेंही? निर्लज्ज मेली कुठली! चल निघ इथून! पुरुषांमधें तुझें ग काय काम? आतांच्या पोरींनीं बाई अगदींच ताळ सोडला! अग तुला कांहीं तरी लाजलज्जा! (तिला धरायला जाऊं पहाते)

**सुमेरु०**—खबरदार! आगे मत बढ! चंडालिन! हमारी माताजीको छूना मत!

**आनंदी०**—क्रियानष्टा! आत्तां का ही पात्रा माता झाली तुझी?

**गंगा०**—सासूबाई! मी इथें आलें ह्मणून का पात्रा झालें? अशा समयींही येऊं नये ना मीं इथें? आपलें कुंकू—गुचचुप पुसूं देऊं ना तुह्माला? शिव शिव! अस्सें **चांडालकर्म धडधडीत** करून,—आणि वर संभावितपणाचा आणि त्यावर—सासूपणाचा टेंभा मिरवायचा!!! अहो कांहीं तरी लाजा!—मनाला नाहीं पण जनाला तरी! (धांवत जाऊन **नारायणरावां**ला मिठी मारते) जमादार बाबा! हेच हो हे—माझे **पंचप्राण**!—मला परत द्या!

**सुमेरु०**—(मोठ्या खुशीनें) माताजी! हम चाहते हैं,

कि आपकी यह **अपूरब जोडी जुग जुग जीवै!** **यह जुग बिधाता कभी न फोडै!**–

"अचल होहु अहिवात तुह्मारा
जवलग **गंग जमुन** जलधारा!"

**गंगा०**–(सद्गदित होऊन) तर दिलेंच ह्मणायचें तुह्मी मला **चुडेदान**! भगवान तुमचें **कल्याण** करो! (त्याच्या पायां पडते)

**नारा०**–(हंसत) प्रिये, आतां तरी झालीस ना तूं **निश्चित**? ह्मटलें नव्हतें मी–कीं या **रामभक्तजी**पासून आपल्यास **भीति** नाहींच ह्मणून? जमादार! हे तुमचे **महदुपकार** जन्मोजन्मीं फिटणार नाहींत हो आह्माला! पण आणखी एवढी कृपा करा!–**या मियांला** मजजवळून दूर करा! याची **क्रूर मुद्रा** पाहून मला भय वाटतें हो! प्रिये! तूंही चल आतां आपल्या महालीं आनंदानें–मीही आलोंच मागोमाग–

**गंगा०**–(आपल्याशीं) हा **काळ** आणि ती **चांडाळीण**–जंवर इथें आहेत, तंवर माझा पाय इथून कसा निघेल बाई! आड उभें राहावें झालें. (एकीकडे उभी राहते चोरून.)

**सुमेरु०**–महाराज! आप निचिंत रहिये! डरिये मत! मैनेही **बेलभंडार** उठाया था आपको मारनेकेवास्ते! हरेराम! और मैही आपको छोडता हूं!–तो फिर आपको दूसरा कौन सुसरा मारसकता है! अब मेरा चाहे सो होय!

इहलोक छूटै—परलोक बिगडै ! पर आपपर हथियार उठानेका नहीं मैं ! (गारदी लोकांस) जवानों ! चलो अपने अपने डेरोंपर ! मियां आस्मान ! मियानमें करो अपनी शमशेर ! सचही हम पापसे बचे !

(कांहीं गारदी आपआपल्या तरवारि म्यानांत घालतात—हें पाहून **आस्मानखान** गारदी लोकांच्या कानीं लागतो तेव्हां ते आपसांमध्यें कुजबुजतात)

**आनं०**—(रागानें बेफाम होऊन व पुढें येऊन) अहारे मेल्या झूठ्या ! खोट्या **कियानष्टा** ! हाच का तो तुझा **दाशरथी सत्यबाणा** ! हा मेला **माळफे-या**—ऐन वेळीं फिरून पडायचाच !—हें मला कळून चुकलें होतेंच !—पण—याच्या **बड्या बातांवर** मी गेलें ! तरी काय चिंता आहे ! (चुटकी वाजविते त्या सरसा **तुळाजी पवार** आंतून पळत येऊन, नकळत **नारायणरावा**चा हात धरून, झटका मारून त्याला खालीं पाडतो. हें पाहून **चापाजी टिळेकर** त्याच्यावर पालथा पडून मोठ्यानें ओरडतो.)

**चांपा०**—अरे वांचवारे वांचवा कोणी तरी **रावसाहेबांस** !—घरभेद्यानें घर बुडिवलें ! (तुळाजीस) निमकहरामा ! मला व्हावें तर मार ! पण या—**बच्च्यावर** दया कररे **कसाबा** !

(हें पाहून **आनंदीबाई पठाणास** इशारा करते, त्या बरोबर तो **खान चापाजीवर** व त्यानंतर **नारायणरावावर** वार करतो.—व **तुळाजी नारायणरावांस** ठार करून पळून जातो आल्या वाटेनें. हें पाहून **आनंदीही** पळून जाऊन आंतील खिडकींतून डोकें बाहेर काढून—मोठ्यानें गर्जून म्हणते)

आनं०—पाहिलेंसना मेल्या मुर्दारा—हिंदुस्थान्याच्या अवतारा!—हें दखनी पाणी! गेला बघ तुळाजी वाघ तुझ्या पिताजीला मारून, तुझ्या माताजीला रंडकी करून, तुझ्या हातावर तुरी देऊन, पार निघून! आणि ही आनंदी पण चालली बघ—आनंदानें टाळ्या वाजवीत! (टाळ्या वाजविते) आतां तूं "हरेराम" करीत ह्मण राम नू काय! (जाते. दादाही गुपचुप निघून जातात.)

(हें ऐकून गंगाबाई धाईधाईनें नारायणरावाजवळ जाऊन, त्याला पाहून, दुःखातिशयानें भांबावून किंकाळी फोडते.)

गंगा०—देवा रे देवा! काय हा इतक्यांत अनर्थ कोसळला! हेंच का तें हंसतमुख!—आणि अस्सें कळाहीन!—दीनवाणें! हेंच का तें तेजःपुंज शरीर!—आणि अस्सें निस्तेज!—अस्ताव्यस्त!!—रक्तबंबाळ!!! (नारायणराव हलल्यासारखा दिसल्यावरून) अहो धांवा हो धांवा! जमादार बाबा! तुह्मीतरी याहो!—पहाहो! अजूनही जिवांतजीव आहे हो आहे! कांहीं तरी उपाय कराहो! (त्याच्या गळां पडून) अस्सेंच का पडायचें आत्तां—? चलायचेंना त्या हिंदोळ्यावर बसून, मला अंकीं घेऊन, झुलायला? कां, आत्तां कां बोलत नाहीं हो? उठून बसावें ह्मणतें अंमळ!—आणि कसें वाटत आहे तें बोलावेंच! एक शब्दतरी—शेवटचा! (त्याच्या तोंडाकडे टक लावून पहात) छे बाई! आतां कांहीं धडगत दिसत नाहीं!

**सुमेरु०**–( खानाकडे पाहून, दांत ओंठ खात, हात पाय आपटीत ) पर इस बेईमान–नमकहराम दगाबाज़–ने दगा किया !–सब गार्दियोंका मुंह काला किया ! !

**आस्मान०**–मगर आपही का हुक्म बजालाया !

**सुमेरु०**–मेरा हुक्म ? अबे वदज़ात ! मैने तो तुझे अपनी शमशेर मियान् में करनेको फर्माया था न ?

**आस्मा०**–( गारदी लोकांकडे हात करून मोठ्या आवेशानें ) सुनियो भाइयो ! यह जमादार बहादुरकी दुरंगी बोली !–अव्वल ख़ुदाकी कसम खिलाके शमशेर उठवाना ! फिर डरकर मियानमें करवाना ! (सुमेरुसिंहाकडे पाहून ) साहेब ! लेकिन–हमारे बाप दादा तो ऐसा फर्माते चले आये हैं–कि:—

"दुरंगी छोडदे–एक रंग हो जा !
सरासर मोम हो–या संग हो जा !"

**गारदी०**–( एकदम ओरडत ) सच्च है ! यही सच्च है ! ! दुरंगी बेढंगी किस कामकी ! ! !

**सुमेरु०**–ऐ नादानों ! तुम भी इस बेढंगेके दममें आ गये ? राम राम ! "को न कुसंगति पाय नसाही" ? यह साधुवचन कैसें झूठ होगा ! अरे भाई ! खुद दादासाहबनें अपने मुंहसे क्या कहा–सो सुना नहीं तुमनें ?–"धरावा" लिखाथा "मारावा" नहीं–यह ?

**आस्मा०**–जी हां ! सब सुना ! मगर खुद उन्ही की

(त्याला हलवून पाहून) हाय हाय! इथें काय राहिलें आहे आतां! **हंस** होता तो गेला उडून! ही **निर्जीव कुडी** पडली आहे इथें! शिव शिव! त्या–**दिव्य देहाला**– आतां **"मढें"** का ह्मणायचें!–(छाती बडवून) हर हर! काय हा पळांत **प्रळय**! असा **महाप्रळय** करून ती **राक्षसी** का **राज्य** करणार! अग **अवदसे**! तूं का **अमरपाटा** घेऊन आली आहेस या **मृत्युलोकीं**! अग उलथून जाशील! यांचें **पतन भोगशील** बरें! असो. आपल्याला काय करायचें आहे आतां! कांहीं का होईना मेलें आपल्या मागें! चलावें आपण आपल्या प्राणनाथांबरोबर झालें!! अहो प्राणनाथ! आली बरें का ही आपली **लाडकी** आपल्या बरोबरच! (त्याच्या अंगावर धाडकन अंग टाकून मूर्च्छित पडते)

**सुमेरु०**–हरे राम! क्या यह **अंधेर** होगया! मेरीही कुमतिसे! श्री तुलसीदासजीनें सच कहा है:—

"जहां सुमति तहँ संपति नाना
जहां कुमति तहँ विपति निदाना!"

**खड्गसिंह०**–महाराज! **तुम** कहा **कीन्ह**! जो होनी राहे–सो व्हय चुकी! उन्ही गुंसाईजीने कहिन है नः—

॥ दोहा ॥

तुलसी भावी जो कहीं–होती अपने हाथ
**राम** न जाते **हरिन** सँग–**सीय** न **रावण** साथ ॥ १ ॥

**सुमेरु०**—( खानाकडे पाहून, दांत ओंठ खात, हात पाय आपटीत ) पर इस बेईमान—नमकहराम दगाबाज़—ने दगा किया !— सब गार्दियोंका मुंह काला किया ! !

**आस्मान०**—मगर आपही का हुक्म बजालाया !

**सुमेरु०**—मेरा हुक्म ? अबे वदज़ात ! मैने तो तुझे अपनी शमशेर मियान् में करनेको फर्माया था न ?

**आस्मा०**—( गारदी लोकांकडे हात करून मोठ्या आवेशानें ) सुनियो भाइयो ! यह जमादार बहादुरकी दुरंगी बोली !—अव्वल ख़ुदाकी कसम खिलाके शमशेर उठवाना ! फिर डरकर मियानमें करवाना ! ( सुमेरु सिंहाकडे पाहून ) साहेब ! लेकिन—हमारे बाप दादा तो ऐसा फर्माते चले आये हैं—कि:—

> "दुरंगी छोडदे—एक रंग हो जा !
> सरासर मोम हो—या संग हो जा !"

**गारदी०**—( एकदम ओरडत ) सच्च है ! यही सच्च है ! ! दुरंगी बेढंगी किस कामकी ! ! !

**सुमेरु०**—ऐ नादानों ! तुम भी इस बेढंगेके दममें आ गये ? राम राम ! "को न कुसंगति पाय नसाही" ? यह साधुवचन कैसें झूठ होगा ! अरे भाई ! खुद दादासाहबनें अपने मुंहसे क्या कहा—सो सुना नहीं तुमनें ?—"धरावा" लिखाथा "मारावा" नहीं—यह ?

**आस्मा०**—जी हां ! सब सुना ! मगर खुद उन्ही की

रानीसाहबाने जो कहा सो क्या आपनें नहीं सुना ? तो फिर अब किस्की सुन्ना और किस्की नहीं सुन्ना ? इस्से बेहत्तर यही है–कि सब **सुनीसुनाई–सुनी अनसुनी** कर जाना ! क्योंकि–आपके पास खुद **दादासाहिबहीके** हाथका **फर्मान** है न ? अजी साहब **"सौ बका–कुछ** नहीं; **एकलिखा** वही **सही"** ठैरता है !

**गारदी०**–दुरुस्त है !–यही सच्च है !

**सुमेरु०**–हां सच्च है !

"**हरदी जरदी** नातजै–**खटरस** तजै न **आम** ॥
जो **हरदी जरदी** तजै (तो) **अवगुन** तजै **गुलाम**"

**आस्मान०**–(समशेर उपारून) मुंह संभालके बोलना ! मेरे हाथ वही शमशेर है भला ! हम क्या गुलाम हैं ?

**सुमेरु०**–(तरवार उपसून) अबे **गुलामके तिलाम** ! तू क्या हमको **शमशेर** दिखलाता है ? "मेरी बिल्ली मुझीसे म्यांव ?" हाय हाय ! जो हरामी–अपने **स्वामीको** मारने नचूका !–वह **कमज़ात** क्या गुरुसे डरेगा ?

**आस्मान०**–(दांत ओंठ खात) अबे **बेवकूफ़** ! **कमज़ात** तो वही ठैरता है–जो पहिले "हां करके" पीछे–ऐनवक्त् पर **नहीं** करजाता है ! हमनें तों **ईमान** रख्खा अपने **ख़ानदान** का !

**सुमेरु०**–क्यौं न हो ! तू **वैसाही ख़ानदानी ख़ानः ख़राब** हैबे ! तब ही तो **'ख़ान'** कहलाता

है न ! अच्छा ! तो आ जा साम्ने ! देखैं तेरा **ईमान** ! और तेरी **ख़ूनी शमशेर** ! बचा ! आज तू ही ब-चेगा—या **मै ही** बचूंगा ! संभाल अपने तईं ! आया देख तेरा **उस्ताद** ! ( त्याच्या अंगावर चालून जाऊं पहातो. गारदी अडवितात. )

**आस्मान०**—अच्छा तो तू ही मर कमूबख्त ! फिर—हैं हम ही हम ! ( आपल्याशीं हंसून ) **आनंदीबाईके कुल-मुख़्तार** !—**गार्दियोंके सर्दार** ! ! ( उघड. ) संभाल ! आया तेरा **हरीफ़** ! ( त्याच्यावर जाऊं पहातो; गारदी अडवितात. )

**एक मुसलमान गारदी०**—( पुढें येऊन मोठ्या ऐटीनें ) अजी जमादार साहब ! अब ये आपसमें टंटे फिसाद क्यौं ? आपहीके **हुकुम**से हम लोग हथियार चमकाते, **नरायनराय**हीको मारनेको आये थे न ? तो फिर वही **कार** हमारे बहादुर **आस्मानखाँ** कर गुज़रे !—इस्में **ग़ैर** क्या किया उन्होने जी ?

**हिन्दु गारदीलोक०**—सच है ! खानसाहिबने बडी बहादुरी की !

**सुमेरु०**—हरेराम ! अब ये **नादान**—क्या हिन्दु क्या मुसलमान—सब **बिगड गये** ! अब इनमें रहना **नरक-बास**से भी **दुःखदायी** होगा ! ! ! तो अरे **सुमेर** ! सुमर अपने **रामको**—और चल **सुरधाम**को इसी घडी ! वह **अंतरजामी—घटघटबासी—पतितपावन सीता-पति** अब भी तेरी **पत रखेगा** ! जद्यपि तू इस उत्पा-

तको **कारण** हुआ है—तौ भी तू उस्का उत्पादक नहीं है! क्यौंकि तूने कुछ यह बुरा काम जानबूझके किया नहीं! फिर भी—तू **निष्पाप** नहीं है! जैसे—अग्निपर अनजाने भी पैर पडनेसे वह जलही जाता है—वैसेही तुझे तेरे इस अनबूझे पापका फल भुगतना ही पडेगा!—छूटनेका नहीं! तो इस **महापापका प्रायश्चित्त इहलोकत्यागही** उचित देखपडता है! तो फिर देर क्यूं? इस असार संसारकी ओरसे मुंह मोड!—इस **नश्वरशरीर**की माया छोड!—और अपने **दीनदयाल भक्तप्रतिपाल जगत्पति राजाराम**की ओर **दौड**!—और उसीके चरणकमलमें लयलीन हो जा!—बस हो चुका! अब इस्के विना तुझे गति नहीं! (गारद्यांकडे पाहून.) भाइयो! तो हमही अब चलते हैं! तुह्मारा **बहादुरखान** तुह्मारे साथ राज करै! (आपल्या पोटांत तलवार खुपसून घेतो.) **राम! राम!! राम!!!** (म्हणून मरून पडतो.)

(हें पाहून एकच धांदल उडून जाते—**गंगाबाई**स दासी आंत उचलून घेऊन जातात—अशांत पडदा पडतो.)

